






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]

७०

संपादक— श्री. रामचंद्र श्रीपाद जोग

चैत्र १८६६

वर्ष १७ वें ] अेप्रिल १९४४ [ अंक २ रा

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १७ वें ] अनुक्रमणिका [ अंक २ रा

(अंक ७०)



## साहित्यवार्ता

प्रसिद्ध अितिहाससंशोधक कै. दत्तोपंत आपटे यांच्या निवडक लेखांचा संग्रह त्यांच्या प्रथम स्मृतिदिनीं म्हणजे येत्या ऑक्टोबरांत प्रसिद्ध होणार आहे. ग्रंथाचीं पृष्ठें अंदाजें ३०० होणार असून त्याच्या प्रकाशनास यशोदाचिंतामणिनिधीच्या विश्वस्तांकडून साहाय्य मिळणार आहे.









# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

## तिच्या वेणीला चांदण्या

( वऱ्हाडी लोकगीत )

( संग्राहक श्री० नारायण नागोराव हूड )

सखू मी जोडतो— बामनाची नात
तिच्या माडीले कळस सात
सखू मी जोडतो— बामनाची पिली
तिच्या नथीले चौफुली
सखू मी जोडतो— बामनाची कन्या
तिच्या वेणीले चांदण्या
सखू मी जोडतो— सखू कोणाची आहे बरी
होते जीवाची जानगिरी !
सखू मी जोडतो— दहिदुधाची साय
आशा लावुनी होते काय !
सखू मी जोडतो— दुधाची उकळी
सखू मानाची मोकळी
सखू मी जोडतो— पाटलाची सून
तिच्या माडीले पंख दोन
सखू मी जोडतो— जोडतो जबरदस्त
पुढे पालखी, मागे गस्त
सखू मी जोडतो— सांगे मनांतली गोष्ट
—सासू माही जरी खाष्ट
सखू मी जोडतो— सखूला काय देऊं ?
—एक पान दोघी खाऊ
सखू मी जोडतो— जोडतो दिलजोगी
—हाक मारा, राहे उभी
सखू मी जोडतो— पैशाबिगर होत नाहीं
—सर बहिणीस येत नाही
सखू मी जोडतो— बामणाची सून
—हातीं रुपया, उदा खण

अनुक्रमणिका



# कै. राजारामशास्त्री भागवत ह्यांचें संशोधनात्मक लिखाण

[ कु. दुर्गा भागवत ]

शास्त्रीबोवांनी संशोधनात्मक असे बरेच लेख लिहिले आहेत. 'भाषाविषयक व्याख्यानां-सारखें त्यांचें कांही लिखाण वजा केलें तर शास्त्रीबोवांचें लिखाण सामान्य जिज्ञासु वाचका-लाच अुद्देशून लिहिलेलें असे, आणि म्हणूनच त्यांच्या संशोधनात्मक लिखाणाचें मोल संशोधनापेक्षा व्यावहारिक दृष्ट्या अधिक ठरतें.

१

शास्त्रीबोवांच्या संशोधनात्मक लिखाणाचे तीन भाग पाडतां येतील. पाहिल्या भागांत' वेदविषयक लिखाण येतें, दुसऱ्या भागांत महाभारतविषयक लेख येतात, आणि तिसऱ्या भागांत अितिहास, पुराणें, भाषा अित्यादि सर्व विषयांचा समावेश होतो.

**वेदविषयक लिखाण—** 'हिंदुधर्मविवेचकां'त १८८५ सालीं 'श्रुतिस्मृति व शिष्टाचार' ह्या लेखाने शास्त्रीबोवांनी वेदासंबंधी लिहावयास सुरुवात केली. परंतु 'हिंदुधर्म-विवेचका'चा हेतु "हिंदुधर्माचें स्वरूप सर्व हिंदु लोकांस थोडेंबहुत कळावें" असा असल्याने त्यांत वेदांची अगदी ठोकळ माहिती तेवढी दिलेली आहे. पुढे पुढे शास्त्रीबोवांचें लक्ष ह्या विषयाकडे अधिक लागलें व त्यांनी वेदांचें, विशेषतः ऋग्वेदाचें, सूक्ष्म अध्ययन केलें. त्याचेंच फळ म्हणजे त्यांचीं ऋग्वेदाचीं अिंग्रजी व मराठी भाषांतरें. त्यांच्या अिंग्रजी भाषांतरापेक्षा मराठी भाषांतर लोकांच्या अधिक माहितीचें आहे. त्याचें नांव 'वेदार्थयत्नकाराचें स्मारक' असें आहे. कै. शं. पां. पंडित ह्यांची वैदिक वाङ्मयाबद्दलची कामगिरी प्रसिद्धच आहे. त्यांची वेदार्थयत्न या नावाची कृति देखील विद्वानांनी वाखाणलेली आहे. त्यांच्या स्मृतीनिमित्त शास्त्रीबोवांनी ऋग्वेदांतील वेगवेगळीं सूक्तें घेअून त्यांचें भाषांतर केलें आहे. त्याचप्रमाणे कठिण शब्दांची फोड करून आणि सूक्तांतील व्यक्तींची आणि प्रसंगांची ऐतिहासिक छाननी करून मूळच्या वैदिक कथा व पौराणिक कथा ह्यांमध्ये किती तफावत आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

ऋग्वेदासंबंधी शास्त्रीबोवांचा दुसरा महत्त्वाचा लेख A Key to interpret the Veda हा आहे. संहितांच्या शब्दांचा अर्थ लावण्याचे व दैवतांचे अितिहास पारखण्याचे प्रयत्न हिंदुस्थानांत यास्काच्या वेळेपासून चालू आहेत, व आधुनिक पाश्चात्य परिशीलनाने वैदिक वाङ्मयाविषयी कुतूहल पुनः नव्या स्वरूपांत जागृत झालें आहे. परंतु इतकें झालें तरी वेदांचा अेकच अर्थ लावणें अजूनहि जवळ जवळ पूर्वीप्रमाणेच दुर्घट आहे. प्रत्येक अभ्यासक आपल्या बुद्धीप्रमाणे वेदांतून नवे नवे अर्थ काढतो. त्यामुळे कुठल्याहि अेका लेखकाचे वैदिक वाङ्मया-विषयी लेख प्रमाण म्हणून धरतां येत नाहीत. अर्थात् शास्त्रीबोवांच्या वैदिक लेखनांत जी विसंगति किंवा संदिग्धता आढळते ती पुष्कळ वेळां अनिवार्य आहे हें विसरून चालावयाचें नाही. भांडारकर, राजवाडे आणि राजारामशास्त्री भागवत ह्यांची प्राचीन वाङ्मयाविषयीची

अनुक्रमणिका

सर्वांत मोठी कामगिरी ही की तिघांनीहि जुन्या वाङ्मयांतले सुटे सुटे शब्द, व्यक्ति आणि दैवतें घेऊन त्यांवर जंत्रीवजा टिपणें देण्याचा प्रयत्न केला आहे. वैदिक वाङ्मयाचा अभ्यास करूं अिच्छिणाऱ्या भावी विद्यार्थ्यांसाठी ही पायवाटच त्यांनी करून ठेवली आहे.

प्रस्तुत लेखांत ऋग्वेदांतील कांही महत्त्वाचीं सूक्तें घेऊन त्यांतल्या शब्दांवर शास्त्रीबोवांनी कांही टांचणें केलीं आहेत. ऋग्वेदसंहिता समोर असल्याखेरीज ह्या सर्वच टांचणांचा परामर्श घेतां यावयाचा नाही. तरी पण त्यांतील कांही महत्त्वाच्या विधानांचा खाली विचार केला आहे.

**सरमासूक्त—** अिंद्राचे शत्रु जे पणि त्यांच्याकडे अिंद्राने देवशुनी सरमा हिला पाठवलें. पणि व सरमा ह्यांचा संवाद ह्या सूक्तांत दिला आहे. ह्या सूक्ताचा विचार करतांना शास्त्रीबोवांनी जीं अनुमानें केलीं आहेत तीं अशीं— (अ) अिंद्र हा अेक अिंद्र नसून अनेक अिंद्र होते. अिंद्र हीं मूळचीं माणसें असून पराक्रमाने त्यांनी वेगवेगळ्या लोकसमूहांवर छाप पाडली; अुदाहरणार्थः— (१) सुमंतु नांवाचा अिंद्र, ज्याने चुमुरि, धुनि, पिप्रु, शंबर, शुष्ण ह्यांना मारलें व दस्यूंचा पराभव केला. ह्या अिंद्राच्या पराक्रमांत विष्णूचा पण वांटा होता. (२) दुसऱ्या अिंद्राने योनीचा पुत्र गिरि ह्याचा पराभव केला. योनि म्हणजेच पृथु योन. पृथु लोक हे मूळचे पार्थियन होत. ह्या अिंद्राचें 'पर्शु व याद्व' ह्या लोकांशीं पण वैर होतें. पर्शु हे पार्स किंवा पारशांचे पूर्वज होत. (३) शंभर क्रतु करणारा संवासीचा पुत्र अिंद्र. ह्याचें नांव ऋचिशाम असें होतें. (४) हिन्दावा मुलगा अिंद्र. (५) मरुत् ज्याचे सेवक आहेत असा धनिष्ठेचा मुलगा अिंद्र. (६) शिप्री नांवाचा अिंद्र. (७) विश्ववापुत्र अिंद्र. (८) पाकस्थामा नांवाचा अिंद्र, कुरुयानाचा मुलगा.

(आ) मरुत् हे मूळचे देवेतर असून अिंद्राच्या आश्रयाने त्यांना प्राधान्य मिळालें.

(अि) दस्यु हे मोंगोलियन लोकांपैकीं होते.

(अी) पणि म्हणजेच फिनिशियन व्यापारी होत. रसा नदीवर त्यांचें वास्तव्य होतें. रसा म्हणजेच मध्य आशियांतील तैग्रीस किंवा युफ्राटिस ह्या दोहोंपैकी अेक नदी आहे.

(अु) ऋषि ही वेदकालीन अेक जात होती. अंगिरस, विश्वामित्र अित्यादि लोकांचा ऋषींशीं निकटचा संबंध आहे.

(अू) बृहस्पति हा देवांचा गुरु व ब्रह्मणस्पति म्हणजे ब्रह्म जातीच्या लोकांचा मुख्य होता.

**जुहूसूक्त—** बृहस्पतीची बायको जुहू सोमाने पळविली. देवांचें सोमाशीं युद्ध होऊन जुहू परत आपल्या पतीकडे कशी आली ह्याबद्दलची कथा ह्या सूक्तांत आहे. ह्या कथेंतील शास्त्रीबोवांचीं विधानें पुढीलप्रमाणे आहेत.

(१) मनुष्य (मनुसंतति) आणि राजन् ह्या जातींच्या लोकांनी जुहूसाठी सोमाशीं युद्ध केलें.

(२) मित्र हा अग्नीप्रमाणेच अेक मनुष्य होता. हा बहुधा वसूंचा राजा असावा.

(३) अश्विनीकुमार हे अश्व नांवाच्या जातीचे मुख्य असून अश्व लोकांत बहुपतित्वाची प्रथा असावी असें 'सूर्यासावित्री' सूक्तावरून वाटतें. अश्व लोक चांगले दर्यावर्दी असावेत.

**पुरूरवासूक्त—** पुरूरवा आणि अुर्वशी ह्यांच्या मीलनाची व वियोगाची कथा प्रसिद्धच आहे. अुर्वशी गंधर्व नांवाच्या लोकांपैकी असावी.

**धर्मसूक्तें**— हीं अनेक सूक्तें असून निरनिराळ्या विषयांसंबंधी आहेत. ह्या सूक्तांवरून शास्त्रीबोवांनी असा निष्कर्ष काढला आहे की यज्ञ हा शब्द अवेस्ता 'यझन' शब्दापासून आला असावा. पण यज्ञ हा पुरुष आहे ही कल्पना स्वतंत्र वैदिक आहे. त्याचप्रमाणे याग ह्या शब्दाची अुत्पत्ति वरीलप्रमाणेच असली तरी याग हा पुरुष होअूं शकत नाही. ह्या लेखांत शास्त्रीबोवांची मतें जरी सर्वच पटण्यासारखीं नसलीं तरी विचारसरणी अनुकरणीय आहे. आपल्या मतांना पुष्टि देण्यासाठी त्यांनी जागोजागीं आधार दिले आहेत. त्यांच्या संशोधनात्मक लिखाणांत ह्या लेखाला त्यांच्या भाषाविषयक व्याख्यानानंतर दुसरें स्थान द्यावें लागेल.

**वेदांतला कोणता भाग कलियुगांतला, कोणता कलियुगापूर्वीचा**— 'वेदांतला कोणता भाग कलियुगांतला, कोणता कलियुगापूर्वीचा' हें 'हेमंतव्याख्यानमालें'तील अेक व्याख्यान आहे. त्याचा आशय पुढीलप्रमाणे आहे:— कलियुगास पांच हजार वर्षे लोटलीं असून कलियुगाचा आरंभ युधिष्ठिर शकापासून झाला. वेदांतील कांही भाग युधिष्ठिराच्या काळानंतरचा आहे.

(१) शौनकाचा संबंध असलेल्या ऋचा नैमिषारण्यांतील शौनकास अुद्देशून आहेत म्हणून त्या कलियुगांतील आहेत. (२) 'द्रष्टे' म्हणजे 'पाहणारे' जे ऋषि होते त्यांच्या ऋचा कलियुगापूर्वींच्या. (३) 'प्रवक्ते' म्हणजे मंत्र रचणारे ऋषि होते त्यांच्या ऋचा कलियुगानंतरच्या. (४) अैतरेय ब्राह्मणांतील तुर कावषेयाची हकीकत कलीनंतरची आहे. (५) अैतरेय आरण्यक जवळ जवळ सगळें कलियुगांतलें आहे. (६) यजुर्वेदांतली तित्तिरि व वैशंपायन यांची कथा कलियुगानंतरची. त्याचप्रमाणे पिशाच, यति अित्यादि शब्द कलीनंतरचे असून अनुक्रमें पिशाच जातीच्या लोकांना व बौद्धांना अुद्देशून वापरले असावेत. (७) सामवेदापैकी शौनकी मनूवरील सामें कलीनंतरचीं.

## २

**महाभारतांतील कांही भाग अुकलण्याचा यत्न**— 'महाभारतांतील कांही भाग अुकलण्याचा यत्न' ह्या लेखांत शास्त्रीबोवांनी जे मुद्दे मांडले आहेत त्याचा थोडक्यांत गोषवारा पुढीलप्रमाणे देतां येअील :—

(१) महाभारताचीं दोन रूपें आहेत. पहिलें २४००० श्लोकांचें भारत. हें सूताने रचलें आणि शौनकाला नैमिषारण्यांत सांगितलें. या सूताचें नांव अुग्रश्रवा असून तो वेदेतर म्हणजे वैदिक प्रणालीच्या बाहेर असणारांपैकी होता. महाभारत हें अेक लाख श्लोकांचें बाड व्यासाच्या नांवावर टाकण्यांत आलें आहे. पण व्यास ही अेक निव्वळ कल्पना आहे. अनेक लोकांचे हात लागून भारत व भारताचें महाभारत बनलें.

(२) ज्या परकीय संस्कृतींचा महाभारतांत ठसा अुमटलेला आढळतो त्या सिंधुनदापलीकडे असणाऱ्या म्हणजे वेदपूर्व आर्यसंस्कृति, ग्रीक आणि यावनी संस्कृति होत.

कुत्रा पांडवांबरोबर स्वर्गांत जातो ती कथा वेदपूर्व किंवा अवेस्ता संस्कृतीची निदर्शक आहे. पांडवांच्या अुत्पत्तीची कथा ग्रीक संस्कृतीशीं जुळते. लाक्षागृहाच्या कथेंतील कालयवनाचा अुल्लेख यावनी संबंध दाखवतो.

(३) ह्याशिवाय अहिंसेचा भाग बौद्ध आणि जैन धर्मांतून आलेला आहे. ब्राह्मणांची महती वैदिक देवांपेक्षा अधिक आहे असें दाखविणारा भाग ब्राह्मण भाटांनी घुसडला आहे. देव व ब्राह्मण ह्यांपेक्षा क्षत्रियांची पायरी वरची आहे असें क्षत्रिय भाटांनी प्रतिपादन केलें.

(४) युधिष्ठिर हा पांडवांपैकी (यमाचा पुत्र असल्यामुळे) सर्वांत लहान होता. अर्जुन सर्वांत मोठा (अिंद्राचा मुलगा असल्यामुळे). पण ह्या गोष्टींचा कथानकांत विपर्यास केलेला आढळतो.

(५) कृष्ण चार होते. पहिला कृष्ण सत्यवतीचा मुलगा. धृतराष्ट्र, पंडु व विदुर ह्यांचा पिता. त्याचा पुढे द्वैपायनाशीं म्हणजे महाभारताचा विस्तार करणाऱ्या व्यासाशीं संबंध जोडला गेला. दुसरा कृष्ण सुभद्रेचा भाअू, कुंतकुलांतील होता. हा अर्जुनाचा सखा. हे दोन्ही कृष्ण अुत्तरेकडील होत. तिसरा कृष्ण सूरकुळांतील असून तो वसुदेव-देवकीचा मुलगा, मथुरेंत राहणारा होता. जरासंधाचा वध ह्यानेच केला. चवथा कृष्ण दाक्षिणेकडील होता. हा नंद-यशोदेपाशी वाढला. हा कर्नाटकी असून त्याचें मूळचें नाव 'कन्हर' होतें. तें ब्राह्मणांनी बदलून त्याचें संस्कृतांत कृष्ण असें रूपांतर केलें. शिशुपाळाचा वध ह्याने केला.

'विचारमाधुकरी' ह्या सदराखाली शास्त्रीबोवांनी १८८३ पासून 'विविधज्ञानविस्तारां'त नाना विषयांवर लेखमाला देण्यास सुरुवात केली. हें सदर जवळ जवळ वीस वर्षें त्यांनी चालवलें. 'मऱ्हाठ्यांसंबंधी चार अुद्गार', 'आमचा देश, आमचे देशी लोक, आमची देशी भाषा' अित्यादि विस्तृत लेखमाला मध्ये आल्यामुळे 'विचारमाधुकरीं'त पुष्कळ खंड पडला आहे. कांही प्रसंगीं हीं तिन्ही सदरें शास्त्रीबोवा अेकदमच चालवीत. त्यामुळे 'विचारमाधुकरीं'तल्या कांही लेखांत पुनरावृत्ति आणि विसंगति आढळून येते. तरी पण हे दोष वजा केले असतां विचारमाधुकरीच्या रूपाने शास्त्रीबोवांनी केलेली साहित्यसेवा मोलाची आहे. महाराष्ट्राच्या भरीव निबंधवाङ्मयांत 'विचारमाधुकरी'चें स्थान अढळ राहील. भाषेच्या दृष्टीने 'पंचजनविचार' आणि 'त्रिमूर्तिविचार' ह्या लेखमाला वाचण्यासारख्या आहेत. ह्या लेखांनंतर शास्त्रीबोवांची भाषा ओबडधोबड होत गेली.

**शककालविचार**— पंचागांत 'शककाल' हा शब्दप्रयोग नेहमी येतो. 'शककाल' ह्या शब्दाचा अर्थ व त्याची सुरुवात ह्यासंबंधी निश्चित मत ठरविणें कठीण आहे. ह्या लेखमालेंत शास्त्रीबोवांनी शककालासंबंधाने चर्चा केली आहे. तिचा सारांश असाः—

(१) 'शककाल' म्हणजे शक नांवाचे म्लेच्छ लोक हिंदुस्थानांत आले तो होय हें म्हणणें अगदी पोकळ आहे. असें असतांहि जर षष्ठीतत्पुरुष समास केला पाहिजे असा आग्रह असेल तर शकांचा काल म्हणजे मृत्यु असा अर्थ घेतला पाहिजे. शकांचा नाश विक्रमादित्यने केला हें काश्मीरसारख्या हिंदुस्थानच्या अुत्तरेस अेका कोपऱ्यांत असणाऱ्या लहानशा देशांतील लोकांसहि विदित होतें. परंतु 'शक' ह्या शब्दाचा खरा अर्थ 'शक्नेति' ह्या संस्कृत रूपापासून निघालेला, म्हणजे 'समर्थ असणारा', असाच धरणें अधिक युक्त आहे. तसें नसतें तर गर्गाच्या हातून युधिष्ठिराच्या काळास शककाल हा शब्द लागला नसता. ह्यावरून असें मात्र समजूं नये की शक हा शब्द म्लेच्छाचा किंवा म्लेच्छगणाचा मुळीच वाचक नाही. 'शककाल', 'शकनृप' असल्या शब्दांतील 'शक' शब्द व म्लेच्छ ह्या दोहोंत मात्र वाच्यवाचक भावाचा स्वीकार करणें बरोबर नाही. ज्याप्रमाणे नाशिकच्या शिलालेखांत 'हूण' हा शब्द लोकवाचक नसून 'सोनें' हा अर्थी वापरला आहे त्याप्रमाणे 'शक' हा शब्द 'सामर्थ्यवान्' असा समजावा.

अनुक्रमणिका

पहिला शक भारतीय युद्धाचा. दुसरा कलियुगाचा. तिसरा शककाराचा म्हणजे शालिवाहनाचा. भारतीय युद्धापासून म्हणजे युधिष्ठिराच्या अभिषेकापासून ३०३० वर्षे गेलीं आणि शालिवाहनापासून ५०६ वर्षे गेलीं. तेव्हा रविकीर्तीनें अिवळी येथील जिनमंदिर तयार झालें. ह्यावरून २५२४ वर्षे युधिष्ठिर शक चालला व २५२५ वर्षापासून शालिवाहन शकास आरंभ झाला. कलीचीं १२५० वर्षे युधिष्ठिरशक वजा करून गेलीं व १५५० व्या वर्षी रविकीर्तीने देअूळ बांधलें. १५५० त ५०६ वर्षे वजा केलीं असतां बाकी ७४४ वर्षे राहतात. ह्यावरून कलीचीं युधिष्ठिरशकविरहित ७४४ वर्षे गेलीं व ७४५ व्या वर्षापासून युधिष्ठिरशकास आरंभ झाला.

ह्या लेखांत शास्त्रीबोवांची विषयांतराकडे बरीच प्रवृत्ति दिसून येते. अुदाहरणार्थ, 'नंद' राजे शूद्र होते ह्याबद्दल अवास्तव चर्चा, मौर्य हें नांव मोरे ह्या शब्दावरून आलें ह्याबद्दल व्युत्पत्तीचा आधार. ह्या लेखांत दूरान्वयी मुद्दे बरेच असल्यामुळे टीकाकारांची आयतीच सोय झाली आहे.

**वैष्णवविचार**— ह्या लेखांत विष्णु हा शब्द अीश्वर ह्या अर्थी लेखकाने वापरला आहे; शिवविरोधक दैवत म्हणून नव्हे. भृगु, अंगिरस, कपिल, याज्ञवल्क्य अित्यादि ऋषि वैष्णवमताच्या अुत्पत्तीस कसे कारण झाले हें शास्त्रीबोवांनी सांगितलें आहे. महावीर व बुद्ध ह्या ब्राह्मणविरोधी दुकलीमुळे ब्राह्मणधर्मावर अनेक हल्ले झाले. पण त्यांतूनहि 'भगवद्गीते'सारखें रत्न निफजलें व वैष्णवधर्म अधिक अुज्ज्वल स्वरूपांत पुढे आला. ब्राह्मण 'भगवद्गीता' काखोटीस मारून दक्षिणेकडे गेले. कर्मकांडाने आंधळे झालेले याज्ञिकहि पुढे वैष्णव झाले आणि त्यांनी वैदिक धर्म व योग ह्यांची व्यवहारांत कुशलतेने सांगड घालून 'भगवद्गीते'च्या आधारावर वैदिक धर्म दृढ केला.

## त्रिमूर्तिविचार :—

**शिव**— त्रिमूर्तीत शिव ही प्रधानमूर्ति आहे. सविता व शिव अेकच होत. सविता हा शब्द 'सू' धातूपासून झाला आहे. 'सू' म्हणजे प्रसवणें. अर्थात् सवित्यांत स्त्रीत्वाची कल्पना अभिप्रेत आहे. शिवाची मूर्तीदेखील तीन मूर्तींपासून म्हणजे शक्तींपासून बनलेली आहे. अुदाहरणार्थ- (१) काली. सविता हा कालाचा नियंता. ह्या कल्पनेंतून ही शक्ति अुत्पन्न झाली. (२) पशुपति ही जीवांचें रक्षण करणारी शक्ति आहे. (३) लिंग ही अुत्पादक शक्ति आहे. पशु म्हणजे गाय. आणि 'गो' ह्या शब्दाचा अर्थ किरण असा होतो. अर्थात् सूर्याच्या किरणांपासून प्रकाश, पाअूस, अन्न अित्यादि निर्माण होतात आणि त्यांच्यावर जीवसृष्टीची अुपजीविका होते. सूर्य आणि शिव ह्या दोन शक्ति अेकाच रूपाच्या आहेत.

शिवाचे दोन अवतार आहेत. प्राचीन शिव म्हणजेच रुद्र. त्र्यंबक पण तोच. त्र्यंबक व अंबिका हीं बहीण-भावंडें होतीं. दक्षयज्ञानंतर ह्या शिवाचें मूळचें रूप पालटून त्याला हिमालयांतील शिवाचें अर्वाचीन रूप मिळालें. येथून पार्वतीच्या चरित्रास आरंभ होतो.

**विष्णु**— विष्णु हा मूळचा यज्ञस्वरूप होता. आकाश व समुद्र हेहि पुढे अधिकाराने विष्णु समजले गेले. लक्ष्मी म्हणजे आकाशाची शोभा. विष्णु व लक्ष्मी ह्या जोडप्यांत मीला दासीरूप देण्यांत आलें. त्याच्या अुलट शिव व शिवा ह्यांचा खरा अर्धांगयोग आहे. योग मनास पावन करणारा आणि 'अनिर्वचनीय आनंदाची खाण' होय. त्रिमूर्तीतील

दुसरी मूर्ति– विष्णु– जर 'ह्या भरतमूर्मीत तोंड न दाखवती तर स्त्रियांची अवस्था अितकी शोचनीय झाली नसती.' अति प्राचीन काळीं स्त्रीलिंगाचा मान पुल्लिंगापेक्षा अधिक होता. अुदाहरणार्थ, सूर्याचंद्रमसौ, अग्नीवरुणौ अित्यादि.

**ब्रह्मा**— ब्रह्मा हा वेदपुरुष होता. क्वचित्प्रसंगीं यज्ञपुरुष पण तोच समजला जात असे. यज्ञाशीं संबंध आल्यामुळे विष्णूशीं पण त्याचा संबंध आला. त्यामुळे विष्णूचें पुत्रत्व त्याच्याकडे आलें. यज्ञामुळे प्रजा मिळते म्हणून ब्रह्मदेव निर्माता झाला.

**दशावतार**— दशावतार ही लेखमाला नीट वाढवली असती तर फार महत्त्वाची झाली असती. कारण अद्याप दशावतारावर कुठलेंच चांगलें पुस्तक अुपलब्ध नाही. शास्त्रीबोवांनी ही लेखमाला लिहिली तेव्हा ती कुठल्या हेतूने लिहिली हें कळत नाही. कारण, त्यांत कांही अवतारांचें वर्णन अजिबात नाहीं, तर कांहींचें अगदी त्रोटक आहे. अुदाहरणार्थ, वराह, कूर्म व परशुराम ह्यांबद्दल जवळ जवळ कांहीच माहिती नाही. रामावताराची पण थोडीबहुत तीच कथा. कदाचित् ही लेखमाला अपूर्ण असावी. 'दशावतारां'तील महत्त्वाचे मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत.

**(१) सवित्याचें महत्त्व**— सविता ज्याप्रमाणे शिवरूप त्याप्रमाणे विष्णुरूप पण होता. वामन म्हणजेच सविता. सवित्याचें वामनरूप अगदी लहान होय. 'तीन प्रकारांनी पाअूल टाकलें' असें जें सूक्तांत वर्णन आहे त्याचा अर्थ असा– सूर्य उगवल्यानंतर क्षितिजावर येतो, दुपारीं आकाशाच्या मध्यमार्गी व संध्याकाळीं फिरून क्षितिजावर येतो.

(२) मत्स्योपाख्यानांत मनूचें नांव आहे. मनु हा मानवांचा बाप म्हणून मत्स्यावतार पहिला झाला. ह्या आख्यानांत असुरांचा संबंध नाही; पण वैष्णवांस त्याशिवाय बरें वाटेना. म्हणून शंखासुराचा संबंध जोडावा लागला.

(३) कूर्मावतार हा वराह व नरहरि ह्या दोन अवतारांनंतर झाला असला पाहिजे.

(४) परशुराम खिस्तापूर्वी १२ व्या किंवा १३ व्या शतकांत झाला असला पाहिजे. कारण परशुरामशक मलबारांत चालतो.

(५) कृष्णावतार रामावताराच्या अगोदरचा आहे. गोप लोक स्थायिक नव्हते. रामाच्या वेळीं लोक स्थायिक झाले होते.

**यदुक्षेत्र कोणतें व त्यांत ब्राह्मण आले केव्हा ?**— ह्याहि लेखमालेंत असंबद्ध व्युत्पत्तींनी भरलेले दोन तीन लेख आहेत. शेवटल्या लेखावर तर नांव देखील नाही. त्यामुळें ते वरील सदरांतीलच आहेत की नाही हेंहि सांगणें कठिण आहे.

ह्या सर्व लेखांचा थोडक्यांत सारांश असा— यदुक्षेत्र हें नांव 'यदु'वरून पडलें. यदु दोन होते. पहिला दैत्याचा मुलगा यदु, आणि दुसरा ययातीचा मुलगा यदु. यदुक्षेत्र हें वृंदावन मथुरा म्हणजे यमुनेच्या आसपासचें आणि नर्मदेच्या अुत्तरेकडचें नसून दक्षिणेकडचें होतें. त्यांत गुजरात, गोदावरीच्या आसपासचा भाग, कोंकण (गोकर्ण), गोंवें, (गोपकपतन) इत्यादि 'गो' शब्दाशीं संबंध दाखवला जाणारे प्रांत येतें. गोवर्धन, गोमान हे अतिप्राचीन काळचे पर्वत दक्षिणेतलेच आहेत. 'कृष्णा' नदी दक्षिणेसच आहे.

आभीर हा शब्द गवळीवाचक आहे. आभीर राजे दक्षिणेंतच राज्य करीत असत.

अनुक्रमणिका

गोप हे मूळचे दाक्षिणात्य असून कृष्ण हाहि दाक्षिणात्य असला पाहिजे. ज्या नदींत कृष्णाने कालियाचें दमन केलें ती सूर्यदुहिता होती. यमुना सूर्यदुहिता असल्यामुळे मथुरेच्या आसपासच कृष्णाची जन्मभूमि ठरली पाहिजे असें नाही. तापी किंवा तपती ही पण सूर्य-दुहिताच होती. जर नर्मदा चंद्राची मुलगी तर तिला समांतर असणारी तापीच खरी सूर्यदुहिता होय. काळ, मृत्यु व यम हे तीन पर्याय होत. सूर्य हा काळकर्ता व यमुना पडली प्रत्यक्ष काळी; त्यामुळे काल व काली हीं दोघें बहीण-भावंडें ठरवून यमुनेस सूर्यदुहिता करण्यांत आलें. मथुरा हीच सह्याची मदुरा. हीच यदूंची आद्यभूमि. अर्थात् यादव हे मूळचे द्रविड होते. यदूंचा विस्तार विदर्भांत आणि बुंदेलखंडापर्यंत झाला होता.

यदुक्षेत्रांत द्राविडी लोकांची व गोपांची मूळची वस्ती असून त्यांत ब्राह्मण फार उशीरां आले. शालिवाहन शक१६१६त हेमाद्रीच्या वेळेपासून त्यांना महाराष्ट्रांत प्राधान्य मिळूं लागलें.

**पंचजनविचार**— ही लेखमालाहि फार विस्काळित असून व्युत्पत्तीवरच सारा भर दिलेला आढळतो. ह्या लेखांतील पंचजनांचें वर्णन व संस्कृत भाषेच्या व्युत्पत्तीमध्ये आलेलें पंचजनांचें वर्णन ह्यांत फार तफावत आहे. व्याख्यानें बरींच मागून लिहिल्यामुळे हा फरक पडला असावा. ह्या विस्तृत लेखमालेचा मथितार्थ थोडक्यांत पुढीलप्रमाणे आहे :—

अगदी पूर्वी अेकच जन (लोक) होता, व तो अेकाच पुरुषापासून व स्त्रीपासून निघाला हा केवळ भ्रम आहे. वेदांत पंचजन हा शब्द मनुष्यमात्राचा वाचक म्हणून वापरला आहे. परंतु हा शब्द मनुष्यवाचक होण्याचें मुख्य कारण असें की मूळ अेकंदर मानववंश पांच मुख्य जातींत सामावला होता. ह्या मोठ्या जाति लहान लहान पोटजातींच्या बनलेल्या होत्या. त्या जाती मनुष्य, गंधर्व, असुर, राक्षस व सर्प ह्या होत. मनुष्य हा शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असल्यामुळे तो मनुष्यमात्राचा वाचक होअूं शकत नाही. तेव्हा अर्थातच जन शब्दाची प्रवृत्ति होऊन, ते जन पांच होते म्हणून पंचजन असा मनुष्यमात्राचा वाचक शब्द वापरण्यांत येअूं लागला. मनुष्य, मानव, मनुज आणि मानुष हे चारहि शब्द पुढे शेकडों वर्षांनी मनुष्य-मात्राचे वाचक झाले. आणि पंचजन हा शब्द लुप्त झाला. देव व मनुष्य ह्यांचा गोदावरी-वर वास होता. गंधर्व व असुर ह्यांचा सिंधुनदीवर होता. राक्षसांची मूळची भूमि सिंहलद्वीप व यक्षांचें आद्यस्थान ब्रह्मपुत्रा नदी. त्याचप्रमाणे सर्पांची वसति काश्यप सरोवरावर (कॅस्पि-अन समुद्र) होती.

अमरावती वगैरे देवांचीं नगरें; अयोध्या वगैरे मनुसंततीचीं होतीं. यक्ष व राक्षस हे दोघेहि पुलस्त्याची संतति समजले जात असून त्यांचीं नगरें लंका, अलका वगैरे होतीं. नाग म्हणून डोंगरी लोक होते; तो यक्षांचाच पोटभेद असावा. देव व देवांचे पोटभेद पहिल्याने थोडे अुत्तरेस व पुढे लवकरच पश्चिमेस वळले. यक्ष पहिल्याने थोडे अुत्तरेस व पुढे लवकरच पूर्वेकडेस वळले. सर्पांनी राक्षसांच्या पूर्वेस व पश्चिमेस असा जो थंड ओसाड प्रदेश (मध्य आशियाचा) पडला होता, तो व्यापला. राक्षस जलमार्गाने पश्चिमेस गेले. याप्रमाणे मूळच्या पांच लोकांनी सर्व भूभाग व्यापून टाकला.

# मराठींतील ऑस्ट्रिक शब्द

ले० श्री. कृ. पां. कुलकर्णी

## स्वरवर्ग

१ **अंगार, अंगारा, अिंगळ** : ह्या मराठी शब्दांच्या मुळाशीं संस्कृत अंगार हा शब्द आहे. आता ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. अङ्गु, जेंग–क, जेंगकट (सकअी), निंग–कह (सेन), रगोक् (ख्मेर).

२ **अम्मा** : हा मराठी शब्द स्तन ह्या अर्थी आहे. बू शब्दहि त्याच अर्थी आहे. आता ह्याच्याशीं पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. आम्, आहम्, आम्, अम्, बू, बोस्, ब्रोउ.

३ **आलें** : हा मराठी शब्द आर्द्रकम् ह्या संस्कृत शब्दापासून आला असें म्हणतात. परंतु तें अुत्तरकालीन संस्कृतीकरण दिसतें. मलायी–अल्य, इलिय, बेस. के. मापेंत लिया असे शब्द असून तें भाताबरोबर खातात असें म्हणतात.

४ **अुंट** : हा मराठी शब्द तर जशाचा तसा ऑस्ट्रिक भाषांत आहे. (P.31)

५ **अुंदिर** : ह्या मराठी शब्दाच्या मुळाशीं संस्कृत अिन्दुर, अुन्दुर असे शब्द मानतात. ही पारंपरीक व्युत्पत्ति आहे, पण कृत्रिम आहे. अुत्तरकालीन संस्कृतीकरण अुघड अुघड दिसतें. ख्मेर भाषेंतील कन्दूर, जुन्या ख्मेर भाषेंतील कोन् हे शब्द ह्याबाबत चिन्त्य आहेत. मराठी किंवा हिंदी चुवा ह्या शब्दाशीं ऑस्ट्रिक चाअ, त्साअ हे शब्द ताडून पाहा.

## कवर्ग

६ **कचरा** म्हणजे घाण, केर. प्राकृत शब्द कच्चो असा आहे (दे. ना. मा. २–२). ऑस्ट्रिक शब्द चिचा, किचा, चिकक, सकअी असे आहेत. मराठी चिखल शब्दहि ताडून पाहण्यासारखा आहे.

७ **कड, कडा, कटी** : हे मराठी शब्द आहेत. ह्याच अर्थाचे पुढील ऑस्ट्रिक शब्द आहेत. का, कक्, केरो, कोरो, केरू, कोडु, कोड्रोअि, क्रोअि, कारे (मॉन्) किअह.

८ **कपाल** : हा मराठी शब्द सं. कपाल शब्दापासून आला आहे. ह्याच्याशीं पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. केब्रल, क्पाल (ख्मेर), कपल, कॉअि (मलायी), कांअि, कोअि, खोअि, कोअे, क्चोअि, कोअिक, अेकोअिक, कवे, किवे (सेम्, केराह अि.) (H. 46)

९ **कळक** : हा बांबू ह्या अर्थाचा मराठी शब्द व प्राकृत शब्द आहे. (दे. ना. मा. २'८). करेक करेक् हे ऑस्ट्रिक शब्द त्याच अर्थाचे आहेत. ल, लेस्, ले–अु ह्या शब्दांचा कळक हाच अर्थ आहे.

---

१. J. Crawfurd Dict. P.143.

१० काळाकुट्ट : हा अेक द्विरुक्त शब्द आहे. काळा आणि कुट्ट ह्यां दोन्ही शब्दांचा अर्थ अेकच आहे. काळा शब्द आर्य असून कुट्ट हा ऑस्ट्रिक मूळ असावा. त्यासारखे पुढील शब्द आहेत. हेरकोट, अेकुट, हिकुट, हि–कुट ह्यांतील हे आणि कुट हे दोन्ही अेकाच अर्थी आहेत.

११ कुकलें म्हणजे लहान, तान्हें. हा मराठी शब्द आहे. ह्याच्याजवळचा प्राकृत शब्द कुकुला (दे. ना. मा. २-३३) हा आहे. कहेडो हा प्राकृत शब्द त्याच अर्थी आहे. (दे. ना. मा. २-१३). ऑस्ट्रिक शब्द ह्याच अर्थी किनेट्-त्, केदह्, केडह् (Y. 41) असे आहेत. ऑस्ट्रिक भाषांत क ह्या अवयवाचा अर्थ लहान असा असून तो निरनिराळ्या शब्दांत येतो. संस्कृतमध्येहि क हा अवयव त्याच अर्थी कत्, किम्, कन्, कनीयस्, क, कन्या, कण कणस (मराठी–कणीक, कणीस) अित्यादि शब्दांत आहे. काहली (=तरुणी–२-२६) ह्या प्राकृत शब्दाशीं केरदह् हा ऑस्ट्रिक शब्द संबद्ध दिसतो. किंघरो, –री (=लघुमत्स्यः) ह्या प्राकृत शब्दाच्या जवळचा किंधाअि हा ऑस्ट्रिक शब्द दिसतो (S. 321). केन्, केनूँ, केनँग, केदीं हे अपत्यवाचक ऑस्ट्रिक शब्द आहेत. मराठी खरतवंड ताडून पाहा.

१२ कुरूप म्हणजे कांम्याने केलेलें घर. ऑस्ट्रिक शब्द कुरप, कुरफ असे त्याच अर्थी आहेत.

१३ कुरंग : ह्या शब्दाचा अर्थ हरीण. किजंग, कियंग, किदंग (मलायी, जावानी) हे ध्वनिसदृश त्याच अर्थाचे शब्द आहेत. मराठी सांबर व सं. शंबर हा शब्द सांभूर (रियांग) व सं, सारंग शब्द सेलारांग, स्रांग (पँट कॅप स्रिम्) ह्या शब्दांना जवळचे आहेत. (D. 67)

१४ कोळी : (कोलिओ तन्तुवायजालकारकृमिश्च–दे. ना. मा. २·६५) ह्या शब्दाच्या जवळचे किल्तौं, क्लाअु, ग्लाअू हे ऑस्ट्रिक शब्द आहेत.

१५ खाकरा, खास : हा मराठी शब्दांसारखे त्याच अर्थी पुढील शब्द आहेत. कहाक्, खाक्, केरहाक्, दहाक्, काहेस्.

१६ खाट, खाटें : ह्या शब्दांचा अर्थ खारट असा आहे. खाटें वरण, खाटी डाळ ह्या प्रयोगांत तो आढळतो. अितर हिंदी भाषांतहि तो आहे. ऑस्ट्रिक शब्द त्याच अर्थाचे काट, कट, चाट्, चट् असे आहेत.

१७ गज : हा संस्कृत शब्द आहे. ह्याचा अर्थ हत्ती (हला २·५९). हाच शब्द ऑस्ट्रिक भाषांत आढळतो. पाहा गगो (यू. केल), गज (सें. बेग), गाजह् (तेंबी, सराअु). ह्याचींच अितर रूपें गजाह, गेजाह, गेजेह अित्यादि आहेत (E. 44.51). मराठी गेंडा व संस्कृत गंडको हे गोसेल, गुसील हा शब्दांचे संबंधी असतील काय?

१८ गजकर्ण : हा खरुजेचा अेक प्रकार आहे. परंतु त्याचा हत्तीच्या कानाशीं कांही संबंध नाहीं. सकाअी भाषेंत गस्, गच व बहनार भाषेंत गच, गश्रि असे शब्द असून त्यांचा अर्थ जनावराच्या कातडीचा रोग असा आहे. हे शब्द तर मराठी शब्दाच्या मुळाशीं नसतील ना? मलायी भाषेंत गजहकुरप ह्या शब्दाचा अर्थ कातडीचा रोग असा आहे. कुरूप पाहा.

१९ गळ : हा मराठी शब्द छिद्रवाचक आहे. मुलें गोट्या खेळतांना गल म्हणतात. सिंधीमध्ये गऊ, गिल्, गिड असे शब्द आहेत. मलायी शब्द ह्याच अर्थी गोल, गुल् असे आहेत.

**२० गळा, घाट :** हे शब्द मराठी आहेत. त्यांचीं संस्कृत मुळें अुपलब्ध नाहींत. ऑस्ट्रिक शब्द ह्या दृष्टीने चिन्त्य आहेत. सेमांग भाषेंत गॉट, गॉड; सकाअी भाषेंत ग्लोट, गलो हे आहेत. गलो हा सकअी शब्द कांही शंकाच ठेवीत नाही. गळ्याचा नणी किंवा घाट हा शब्दहि वरील सेमांग शब्दाशीं संबद्ध असला पाहिजे. कोलो असा देशी शब्द हेमचंद्र देतो (है. २-४५).

**२१ गाल :** ह्या मराठी शब्दाचें मूळ 'गल्ल' असें आहे. संस्कृत शब्द कपोल हा आहे, व तो ऑस्ट्रिक शब्दाशीं संबद्ध आहे. कप, कपो, कपोअु (सकाअि), तपोअ (निकोबार), थबाल (ख्मेर), मराठी थोबाड शब्द ख्मेर थबाल ह्या शब्दाशीं संबद्ध दिसतो.

**२२ गोचीड, गवळी, (रामाची) गाय** हे कीटकवाचक मराठी शब्द आहेत. गोआलिआ हा देशी प्राकृत शब्द आहे (दे. ना. मा. २-९८). गव्, गाअि हे ऑस्ट्रिक शब्द त्याच अर्थी आहेत.

## चवर्ग

**२३ चरू** म्हणजे तांदळाच्या भाताचा गोळा किंवा पिंड. हा संस्कृत तत्सम आहे. आता ह्याच्याशीं पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. स्राअु (ख्मेर), स्रो (मॉन्). चरोअि (सकअी), जरोअि, चरोअि (सकअी) अित्यादि.

**२४ चिचुंद्री :** ह्या शब्दाचें मूळ सं. छच्छुंदरी असें सांगण्यांत येतें (हलायुध २-८०). ख्मेर भाषेंत चन्देर, चंतूर व जावानी भाषेंत चिन्दिल = लहान अुंदीर असे शब्द आहेत. तसेच निकु आणि अीकू असे शब्द मलायी भाषेंत आहेत. ह्यांतील अीकू हा संस्कृत आखु ह्या शब्दाच्या जवळचा वाटतो. चोचोअी आणि चअआ असेहि आणखी शब्द आहेत. ह्या आणि वरील चिन्दिल व चंदेर ह्या शब्दांचा चिचुंद्री शब्दाशीं संबंध असावा. ह्याशिवाय अुंदीरवाचक अितर शब्द कने, कनेक, कनक, कनेक, कंक, कनअी, कनेट, कनेट, कोन् अित्यादि शब्द प्लूस, बेसेसप्, निग्री, कोनै वगैरे पोटभाषांत आहेत. ह्या सर्वांचा तर संस्कृत खनक ह्या शब्दाशीं संबंध अुघड अुघड दिसतो. हिंदी चुआ शब्दाशीं चअआ हा शब्द साम्य दाखवितो (R. 33-35). मलायी भाषेंत मांचित् व बारान भाषेंत मोन्सी असे शब्द आहेत. 'मावशी' जे आपण अुंदराला म्हणतों तें ह्यापासून नसेल ना ?

**२५ चिमणी :** हा अेक लहान पक्षी आहे. हा ध्वनिशब्द असावा. चीआ, चिअअु हे ऑस्ट्रिक शब्द आहेत.

**२६ चिलट :** ह्या मराठी शब्दाच्या संबंधी ऑस्ट्रिक ची, चअि, चोअं, सअि, चेअि, चे हे शब्द आहेत.

**२७ चुडी** म्हणजे दिवटी. चुडुली अुल्का (दे. ना. मा. ३-१५), चुल्ली शिला (३-१५) हे प्राकृत शब्द आहेत. पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. चुल, कुल, चुला, कुला, चुनू-दन्न (मलायी), (मराठी-चांदणी). चेअुत्, चेअोत्, चो-ओत्, चितुते, चाअोत (S. 433, 466).

**२८ छिनाल :** हा शब्द प्राकृत छिणो, छिणालो, छिंछओ, जारः (दे. ना. मा. ३, २७-३६) पासून आहे. ऑस्ट्रिक नोअि, हेनोअि, नेनोअि अित्यादि शब्द ह्याबाबत चिन्त्य आहेत. मराठी निजणें (= मैथुन करणें) हा शब्दहि अेतत्संबंधी चिन्त्य आहे.

२९ छूँ छूँ, कूँ कूँ : हे मराठी शब्द कुत्रां अंगावर घालतांना व कुत्र्याला बोलावतांना वापरतात. तें कां हें आपणांस सांगतां येत नाही. तें ऑस्ट्रिक भाषांच्या साहाय्याने सांगतां येतें. वज्रभूमि व शुभ्रभूमीच्या निर्जन प्रदेशांत महावीर फिरत असतांना त्याच्या अंगावर छूँ, छूँ म्हणून तेथील लोकांनी कुत्रीं घातलीं. तो प्रांत 'कोळ' लोकांच्या वस्तीचा होता. ते लोक ऑस्ट्रिक वंशांतीलच अेक भाषा बोलतात. ख्मेर भाषेंत छके, चुके; सेदांग भाषेंत छो, चो; आनामी सेदांग भाषेंत छो, चो; बुरू भाषेंत चुरु; सेमांग भाषेंत चु, चुआ, चुओ, छुओ वगैरे शब्द कुत्रावाचक आहेत. तेव्हा त्याला बोलावतांना कुत्र्या कुत्र्या असें चु चु चु चु म्हणून अुच्चार करतात. त्यावरून आपला कु, कु, कु व छु, छु, छु हे शब्द आले. हीच प्रक्रिया इया इया, हैक हैक, दा दा दा, पिस् पिस्, ह्या प्राणिआवाहनी शब्दांच्या मुळाशीं आहे.

३० छोटा : हा मराठी शब्द लहान ह्या अर्थी आहे. हा मराठींत हिंदीमधून आला. पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. अिछेत् (सिमँग), चोट (बेसंग), कसूट, बचिट, मचूट, चूट (अचिनी).

३१ जळतें : ह्या मराठी शब्दाशीं ऑस्ट्रिक जालात् जाल्त हे ताडून पाहण्यासारखे आहेत.

३२ जांग, जांगाड, जांगड : ह्या मराठी शब्दांच्या मुळाशीं संस्कृत जंघा हा शब्द आहे. पुढील ऑस्ट्रिक शब्द संस्कृत जंघा शब्दाच्या मुळाशीं आहेत काय अशी शंका येते. सेमसकअी भाषेंत चन् चोंग, जोंग, जॉंग, जुक्न व मोन् भाषेंत जोंग, स्तीअेंग भाषेंत जुंग, ख्मेर भाषेंत जोंग, चोंग, संताळी भाषेंत जंग्ग हे शब्द मांडीवाचक आहेत. ह्यांचें संस्कृतीकरण होअून संस्कृत शब्द जंघा बनला असावा.

३३ जांब : मलायी भाषेंत जंबु हा शब्द सामान्यफलवाचक आहे. विशेषत: बाहेरून गुलाबी कवची व आंतमध्ये पांढरा मअू मगज असलेलें सामान्यतः पेरूच्या आकाराचें व किंचित् आंबट असें तें असतें.[२] संस्कृतमध्यें शब्द जंबीर आहे.— करुणो जंबीरः स्यात् (हला. २.३९).

३४ ज्वारी, जोंधळा : हें अेक प्रकारचें धान्य आहे. ह्याचा संबंध दूरान्वयाने यव ह्या संस्कृत शब्दाशीं लागणें संभवनीय आहे. हेमचंद्राने (३-५०) जोण्णलिआ, जोवारी असे दोन शब्द दे. ना. मा.मध्ये दिले आहेत. पैकी पहिला जोण्णलिआ हा जोंधळा ह्याच्या मुळाशीं व जोवारी हा ज्वारी, जवार ह्यांच्या मुळाशीं नक्की असावेत. आता ऑस्ट्रिक शब्द पाहा. सकाअी– जव, मलायी– जगुंग, जागोंग; जावानी– जाली=कणीस शिंग असे शब्द आहेत (M.102 ). मराठी बाजरी शब्दहि मलायी– बारुलिह, केलेबी– बारोलेह या शब्दांशीं ताडून पाहण्यासारखा आहे.[3]

## टवर्ग

३५ टंपलणें : ह्या मराठी शब्दाचा अर्थ मैथुन करणें. शब्द ग्रामीण आहे. लाक्षणिक असण्याचा संभव आहे. ह्याच अर्थी ऑस्ट्रिक शब्द तेम्पाल, ट्रंपाल, टेम्पेल असे आहेत.

---

२. J. Crawfurd Dictionary P. 113.

३. J. Crawfurd Dictionary P. 237.

३६ टांग, ढांग, ढेंग, टांगडी, तंगडी : हे पायाचे वाचक मराठी शब्द आहेत. पावलापासून वर गुढघ्यापर्यंतच्या अवयवाला हे शब्द वापरतात. पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहण्यासारखे आहेत. मलाया भाषेंत केतिंग; सेलुंग भाषेंत क्तोअिंग, तेंग, टेंग; केदाह भाषेंत केतेंग असे पायवाचक शब्द आहेत. हेच शब्द मराठी शब्दाच्या मुळाशीं असावेत. जावानी भाषेंत डेंगुल व केना भाषेंतील टेंगुह हे शब्दहि मराठी ढेंग, ढांग ह्या शब्दांशीं साम्य दाखवितात. संस्कृत जानु आणि जावानी जेंकु हे शब्द संबंधी दिसतात. (K. 42). संस्कृत जंघा शब्द क्तोंज्ञ व केलेतांग ह्या शब्दांशीं ताडून पाहण्यासारखा आहे.

३७ डाळिंब : ह्याचें संस्कृत मूळ दालिम असें समजण्यांत येतें. ह्या शब्दाचे दा + लिम असे दोन अवयव आहेत. पैकी लिम म्हणजे पांच पाकळ्यांचा समूह. ह्या फळाच्या शिरोभागीं फुलाच्या पांच पाकळ्यांचा अवशिष्ट भाग असतो.[४] त्यावरून संस्कृतीकरण होअून दालिम हा तत्सम शब्द व डाळिंब हा तद्भव शब्द सिद्ध झाला.

३८ टाळकें : ह्या मराठी शब्दाचा अर्थ कपाळाची कवटी असा आहे. ऑस्ट्रिक शब्द कल्का, कल्काकुअि, तलके = खिळा, असे आहेत.

३९ डावा : ह्या मराठी शब्दाच्या मुळाशीं प्राकृत डव्वो, डावो, वामकरः (दे. ना. मा. ४-६) हे शब्द आहेत. ह्या शब्दाचे ड आणि व्वो, वा हे दोन अवयव आहेत. दुसऱ्या व्वो ह्या-अवयवाचा अर्थ अुजवा असा आहे. ऑस्ट्रिक शब्द डा-वल, डा-वाल असे आहेत. डा म्हणजे अुलट, विरोधी, व व्वाल, वल म्हणजे अुजवा. (L. 48).

४० डाहाळी : शाखा (दे. ना. मा. ४'९). मलावी शब्द पाहा. डेहें, डनन् म्हणजे डाहाळी, ढाळी.

४१ डुकर : ह्या मराठी शब्दाचे डेगट्, डेगाट्, गोर, गौर, गाट् हे टेंबी., रासा भाषेंतील शब्द संबंधी दिसतात.

## तवर्ग

४२ तंबाखू, तमाखू : हे शब्द मराठी आहेत. मूळ शब्द हयाटी भाषेंतील आहे. पदार्थ अमेरिकन आहे. हिंदुस्तानांत तो अकबर बादशहाच्या वेळीं आला. तो प्रथम हुक्का प्याला. पुढील ऑस्ट्रिक शब्द पाहा. तेंबाकीं, तोंबाको, तेंबकुअ, तोबाको (जावानी), आको =(पानें), तो = वनस्पति.

४३ तोंड : हा मराठी शब्द संस्कृत तुण्ड पासून व्युत्पादितात. परंतु हें अुत्तरकालीन संस्कृतीकरण अुघड दिसतें. सेंबाल भाषेंत तेनुद, लुंद व ख्मेर भाषेंत थ्नो असे मुखवाचक शब्द आहेत. त्यांचा संकर होअून तुण्ड हा शब्द बनला व त्याने मराठी तोण्ड ह्या शब्दाला जन्म दिला असावा.

४४ थोडें : ह्याचें मूळ संस्कृत स्तोकम् असें आहे. ह्याच्याशीं पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. सेदोकॉन (पॅट कॅप् जोह), स्दोकों, शिदुकॉ, सेदिकित (मलायी). (S. 233.)

४५ नांगर : हा अेक मोठा मजेदार शब्द आहे. संस्कृत शब्द मूळ लांगल असा आहे. ऑस्ट्रिक शब्द तेंगाल (तेंत्री), तेंगल (मलायी), तेंगालक हे संबंधी दिसतात.

४. Crawfurd Dict. P. 10.

**४६ नारळ :** ह्या मराठी शब्दाचें संस्कृत नारिकेल असें आहे. हें अुत्तरकालीन संस्कृतीकरण दिसतें. नियोर (मलायी), कोलअि (तरंग) असे दोन ऑस्ट्रिक शब्द आहेत. नियोरकोलअि असा शब्द तयार होअून त्याने नारिकेल ह्या शब्दाला जन्म दिला असावा व त्यापासून मराठी नारळ हा शब्द निष्पन्न झाला.

**४७ निजणें :** हा मराठी शब्द झोंपणें असा आहे. परंतु मैथुन करणें, संभोगणें असादि त्याचा अर्थ. कदाचित् तो लाक्षणिक असेल. परंतु त्याच अर्थी ऑस्ट्रिक शब्द पहा. निनोअि; नोअि, य मनोअि (यंभनम्).

## पवर्ग

**४८ पलिता :** म्हणजे पेटलेला डोंब. संस्कृत धातु प्लुष् हा असावा. ऑस्ट्रिक पालोप, पालोच, पालोत हे शब्द ताडून पाहण्यासारखे आहेत.

**४९ पाकोळी :** ह्या मराठी शब्दाच्या अगदी जवळचे पुढील ऑस्ट्रिक शब्द त्याचं अर्थाचे आहेत. पुक् (सेम् भाषा), पुक्, पोक, पोक्, पलिक्, पलग्, बलग्, ल्गिक्.

**५० पुर्की, पुकि :** हे मलायी शब्द मराठी स्त्रीयोनिवाचक शब्दाशीं ताडून पाहण्यासारखे आहेत.

**५१ बाहु :** हा मराठी शब्द आहे. अर्थ दंड, हात. पुढील मलायी शब्द ताडून पाहा. बहु, बहू, बहुक, बहुअ, बाहो, बाहू.

**५२ बीज, बीं :** ह्या मराठी शब्दांचा अर्थ मूळ असा आहे. : बिजि, बिजेक्, बिजेह्, बिजिह, बेजिह हे ऑस्ट्रिक शब्द आहेत.

**५३ बेडूक :** ह्या मराठी शब्दाचें संस्कृत भेक असें आहे. परंतु मध्ये 'ड' कसा आला ? मलायी भाषेंत बुअक व सकअी भाषेंत तबेकं, टबेक असे शब्द आहेत. त्या शब्दांत वर्णांत अदलाबदल होअून तर बेडूक हा शब्द सिद्ध झाला नसेल ना ?

**५४ मनुष्य :** ह्या मराठी शब्दाशीं संलग्न असलेले पुढील ऑस्ट्रिक शब्द पाहा. मेनिक्, मेनिह्, मोन, मेअिन, विनिह्, पअुनि, नोअि, मेन्दी. (M. 24).

**५५ मशक, माशी, मच्छर :** ह्या मराठी शब्दांशीं पुढील ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहा. मुस् (ख्मेर), मोअि (स्टीअेंग), मुओअि (अनाम), शोमेश (बाहनर) (M. 180).

**५६ मिशी :** ह्या मराठी शब्दाच्या मुळाशीं श्मश्रु हा संस्कृत व म्हंच्छु, म्हंसु हे प्राकृत शब्द मानण्याचा प्रघात आहे. परंतु 'श्मश्रु' शब्दांत संस्कृतीकरण झाल्याची शंका येते. सकअी भाषेंत मिसेअि, बिसअी; सेमांग भाषेंत मिसअि, व मलायी भाषेंत मिसाअि असे शब्द आढळतात. हे तर मूळ नसतील ना ?

## यवर्ग

**५७ रामफळ :** हें अेक फळ आहे. ह्याचें प्रतियोगी सीताफळ. ह्यांतील पहिल्या अवयवाचा संबंध संस्कृत शीत शब्दाशीं असावा. रामायणांतील राम व सीता ह्यांचा ह्या फळाशीं कांही संबंध नाही. ऑस्ट्रिक शब्द रांबअी, रंबुतन हे त्याच अर्थी आहेत.

**५८ लवंग :** हा अेक मसाल्याचा पदार्थ आहे. मसाल्यांतील सर्वच पदार्थांचीं नांवें ह्या मसाल्याच्या बेटांतील भाषांमधून आलीं असल्यास नवल नाही. त्या बेटावरील माणसें ह्या

पदार्थाचा अुपयोग मसाल्यासाठी करीत नसत. हा अुपयोग प्रथम हिंदी, चिनी, अरब व पोर्तुगीज लोकांनी केला. त्या पदार्थाचा व्यापारहि पोर्तुगीजांनी ह्या द्वीपकल्पावरील लोकांच्या-पासूनच अुचलला. चिनी भाषेंत त्केंग-हिअ असा शब्द आहे. त्याचा मलायी भाषेंत चंगेक असा अपभ्रंश झाला. त्याचा अर्थ सुगंधी अथवा गन्धयुक्त नख असा आहे. ह्याचाच दुसरा प्रतिशब्द लवंग असा आहे. त्याच्यापूर्वी मलायी लोक फलवाचक शब्द वापरतात. तेलंगणांत हा शब्द प्रथम आला. व तो येतांना त्याचा शेवटचा अवयव हिअ किंवा क हा लुप्त झाला. गाअुमेदे असा आणखी अेक तिसरा शब्द आहे. त्याचा संबंध सं. गोमेध ह्या शब्दाशीं अुवड अुघड दिसतो.

५९ **लिंबूर, निंबूर** : ह्या मराठी शब्दाचा अर्थ बाजरीचें कणीस असा आहे. बेस ऑस्ट्रिक भाषेंत लॅबॉग् असा धान्याचा अंकुर ह्या अर्थी शब्द आहे.

६० **लुच्चा** : ह्या मराठी शब्दाशीं पुढील त्याच अर्थाचे ऑस्ट्रिक शब्द ताडून पाहण्या-सारखे आहेत. लुत्, पोलुत् (बाहनार), लुअिच, लुअेच (चोरी) (स्टिअेंग), क्लत्, क्लात् (मॉन्), लुओच (ख्मेर).

६१ **वांगें** : हें अेक फळ आहे. अितर हिंदी अर्वाचीन भाषांत बैंगण, बेगण, बेगुन अशा स्वरूपांत हा शब्द आढळतो. त्यांच्या मुळाशीं संस्कृत वातिंगण, वातिगण असे शब्द मानतात. परंतु हीं अुत्तरकालीन संस्कृतीकरणें दिसतात. ऑस्ट्रिक वंशांतील सेमांग बोलींत तिऑंग, तिअुंग, तिंग असे शब्द वांगेंवाचक आहेत. आणि 'फल'वाचक शब्द बाह, बाहो, बोह असे शब्द आहेत. ह्या दोन्ही शब्दांचे मिळून शब्द बाहतिऑंग, बाहतिअुंग, बोहतिंग असे होतील व त्यांचा अर्थ 'वांगें'सारखें विशिष्ट फल असा होअील. ह्या शब्दांचेंच संस्कृती-करण होअून वातिंगण, वातिगण हे संस्कृत शब्द बनले व त्यापासून मराठी वांगें हा शब्द निष्पन्न झाला.

हीच प्रक्रिया दाडिंब, कदंब, शिंब, निंब, रंभा, निंबू, जंबू, जंबूर, जंबीर अित्यादि फलवाचक शब्दांच्या बाबत झालेली दिसते. ह्या शब्दांचा शेवटचा अवयव बाह्, बुह्, बोह्, बुअह् ह्या सेमांग भाषेंतील फलवाचक शब्दाशीं संबद्ध आहे. ह्याच बाह्, बुह्, बोह्, बुअह् अवयवाला विशिष्ट फलवाचक क, त, र, ल, ज असे पूर्वसर्ग व मध्ये ह्या भाषांत नेहेमी येणारा अनुनासिक शब्द असे आले म्हणजे वर निर्दिष्ट केलेले फलवाचक सर्व शब्द तयार होतात.

६२ **वाटी** : गुडघ्याच्या संधीला वाटी असा मराठी शब्द आहे. त्याचे अन्वर्थक ऑस्ट्रिक शब्द बेटिस्, बोटिस् असे आहेत.

६३ **वारा** : हा मराठी शब्द सं. वात; प्रा. वाअ पासून निष्पादिण्याची प्रथा आहे परंतु मराठी शब्दांत 'रा' कसा आला? पुढील ऑस्ट्रिक शब्द पाहा. बेरुअ, बेरुअह, बेरवा, बर्वा, बेवा, बिओह. ह्यांतील बेवा व बिओह् हे प्रा. बाअशीं संबद्ध दिसतात.

**शवर्ग**

६४ **शेघट** : हा मराठी शब्द प्राकृत छेओ अन्तः (दे. ना. मा. ३-३८) पासून आहे. पुढील ऑस्ट्रिक शब्द पाहा. सअॅं, सेअेंग, सेन्, शेन्, सेन्चेन्, चुंग, चॉंग. (E.63).

६५ **शेळी** : ह्या मराठी शब्दाच्या मुळाशीं शेलओ, छेली, छागः (दे. ना. मा. ३.३२) हे प्राकृत शब्द आहेत. ऑस्ट्रिक हेस्, हयेस्, हेस्स हे शब्द त्याच अर्थी आहेत. (G. 55). बेबेक, बेबे, पेपे, बोबे, बेह् हे शेळीवाचक ऑस्ट्रिक शब्द ध्वनिशब्द आहेत.

६६ सकाळ : ह्या मराठी शब्दाचे अन्वर्थक ऑस्ट्रिक शब्द सिंआकाल, काल, यकाल, वियाकाल असे आहेत. पहाट शब्दाचे अन्वर्थक सुपोल्, सुबोल्, सेलुपो, पोहोपु हे ऑस्ट्रिक शब्द आहेत.

६७ सपाट : ह्या मराठी शब्दाशीं त्याच अर्थाचा चेपेट, पेपाप हे शब्द ताडून पाहा.

६८ सबंद : हा मराठी शब्द पूर्ण ह्या अर्थी आहे. मलायी शब्द स-बेन्दा, सेमुअ, सबेन्दे ह्या सर्वांचा अर्थ पूर्ण, आखा असा आहे.

६९ साल : हा मराठी शब्द प्राकृत छल्ली त्वक् (दे. ना. मा. ३-२४) ह्या शब्दापासून आहे. चेलॉक्, शेलाक हे ऑस्ट्रिक शब्द त्याच्याजवळचे आणि सेलुपट, स्लुप्ट हे मराठी सालपट ह्या शब्दाच्या जवळचे आहेत.

७० सुणें : हा शब्द सं. श्वन् पासून आहे. त्याच्या जोडीला कुत्रावाचक शब्द शुनक, कुर्कुर, कौलेयक, सारमेय, भषण अित्यादि शब्द आहेत (हला. २-१२६). आता ह्याच अर्थाचे ध्वनिसदृश पुढील ऑस्ट्रिक शब्द पाहा. चिओक (सेम्. केन), चू, चुओ, त्सुओ (सेम्. पेर), चुवो, चोर, चुओर, च्छो, छो, छा, छिया, छअु (सक, कोर्व, लियास) (D.143). हे सर्व शब्द श्वन् शब्दाच्या जवळचे आहेत. ह्याशिवाय आणखी अेक चमत्कार ह्या शब्दांत दिसतो. तो छूं, छूं, कूं, कूं हे जे ध्वनि मराठींत कुत्र्यास अंगावर घालतांना किंवा बोलावतांना वापरतात त्यांचा ह्या वरील शब्दांशीं संबंध दिसतो. वरील शुनक शब्दाशीं केनान, केनुन (यू. अिंड) हे शब्द संबद्ध दिसतात तसेच सं. कौलेयक हा शब्द कोयक (जाक, मद्द), कायोक, फोयोक, कोयोप, कुयो, कायाप ह्या शब्दांशीं संबद्ध दिसतो.

७१ हुडकणें : म्हणजे शोधणें. ह्याच अर्थी पुढील शब्द आहेत. कह्, यहोको, होफोप्, हिकप्, हिळके, जेलेहेके. केव् = नेम मारणें; कह = हुडकणें.

येथे ही परकी शब्दांची यादी संपली. ह्यांतील कांही संस्कृत तत्सम व कांही तद्भव स्वरूपांत आहेत. ह्यांतील कांही ऑस्ट्रिक, कांही मुण्डा, कांही चिनी (मंगोलियन भाषा), कांही देशी अशा निरनिराळ्या भाषांतील आहेत. हे आर्य-अिण्डोयुरोपियन भाषांतील नसावेत असें विद्वानांचें म्हणणें आहे.

हिंदुस्तानांतील आर्य भाषा व ऑस्ट्रिक भाषा ह्यांतील साम्यें आम्हीं वर दिलीं आहेत. ही शब्दांची देवघेव आहे. ही देवघेव ऑस्ट्रिक भाषांतून आर्य भाषांत किंवा अुलट आर्य भाषांतून ऑस्ट्रिक भाषांत झाली. दोन्ही तर्क संभवनीय आहेत. परंतु शब्दांचा अुच्चार, अितर तत्संबद्ध शब्दांशीं तुलना, सामाजिक अितिहास, अितर शब्दांशीं अर्थसाम्यें, त्यांची त्या त्या भाषांतील तद्भव रूपें व अितर आनुषंगिक गोष्टी पाहिल्यानंतर हे वरील शब्द मूळ ऑस्ट्रिक असावेत असें विद्वानांचें म्हणणें आहे.

ठिकठिकाणीं आम्हीं ग्रंथांचे आधार दिले आहेत. त्या त्या ग्रंथकाराचे आम्ही आभारी आहों.

# मुक्तक की भावगीत ?

(ले० ना. ग. जोशी)

श्री. पु. मं. लाड यांनी आपल्या ‘स्फुट कवितां’च्या संग्रहाला अेक अतिशय मार्मिक आणि आकर्षक निबंध जोडला आहे. त्यांत मराठींतील भावकाव्याचा वंशवेल किती दूरवर पसरला आहे तें त्यांनी आपल्या चिकित्सक असूनहि वेधक झालेल्या शैलीने दाखवून दिलें आहे. प्रस्तुत निबंधाची सुरवात त्यांनी मोठ्या चातुर्याने केली आहे. कांही पूर्वपक्ष करून नंतर आपली बाजू अुत्तरपक्षीयाच्या आवेशाने मांडली म्हणजे ती खुसखुशीत, आवेशी व वक्तृत्वपूर्ण होते या सोअिस्कर पद्धतीचा अवलंब लाड यांनी केला आहे. ते म्हणतात, “या संग्रहांत ज्या प्रकारच्या कविता आहेत तो काव्यप्रकार इंग्रजी वाङ्मयापायीं आपणांकडे प्रथम चालू झाला असा अेक लोकभ्रम रूढ झालेला दिसतो. याची जात लिरिक हीच मुळीं परकी असें समजतात.” शेवटीं आपलें म्हणणें मांडतांना ते सांगतात, “या प्रकारच्या सर्व काव्यांस ‘मुक्तक’ हा जुना शब्द मुक्रर करावा अशी माझी शिफारस आहे. त्या शब्दाची परंपरा प्राचीन आहे.”

स्वतः श्री. लाड यांनी जेव्हा आपल्या ‘स्फुट प्रासंगिक’ कविता लिहिल्या त्या वेळीं हे ‘मुक्तकीय’ जुन्या परंपरेचे आदेश स्वतः त्यांच्यापुढेहि होते असें वाटत नाहीं. अुलट माधवराव पटवर्धन आणि तांबे यांसारखे वरील लोकभ्रम रूढ करावयास जबाबदार असलेले ‘लिरिक’ परंपरेचेच कवि होते असें वाटतें. यदाकदाचित् ‘मधुपर्क’कार व्यक्तिशः जुन्या परंपरेला धरून काव्य करणारे आहेत असें ठरलें, तरी सध्या रूढ असलेला ‘भावगीतप्रकार हा पाश्चात्य परंपरेवरून आला ही सत्यकथा आहे. ज्या ‘वाघिणीच्या दुधावर’ चिपळूणकर-आगरकर-टिळक यांसारखे वाघाचे बच्चे पोसले, त्यावरच केशवसुत, तांबे, रे. टिळक हेहि पोसलेले होते. सर्वच प्रकारचे लोक— राजकारणी आणि साहित्यिक— त्या वेळीं पश्चिमेकडील लखलखाटाने चमकले होते, कांही दिपून गेले होते. त्यांत ज्यांनी आपले डोळे किलकिले ठेवले, पार मिटून घेतले नाहीत, त्यांना नवीन प्रकाश तर मिळालाच, पण त्यांची मूळ शक्तीहि तगून राहिली. गेल्या शतकांतील दुसऱ्या अर्धाचा हा सामाजिक इतिहास कोणाचीहि न्यायबुद्धि नाकारूं शकणार नाही. त्या वेळीं न्या. तेलंग आणि लोकमान्य टिळक यांनी रामायण-महाभारतादि ग्रंथांविषयी लिहितांना जी टीकाविषयक पद्धति व परिभाषा योजली होती तीहि पाश्चात्यांच्या अनुकरणानेच प्राप्त झालेली होती. ‘भावगीत’ हें नांव पश्चिमेकडून आलेल्या परंपरेबद्दल योजून, नंतर अैतिहासिक दृष्टीने विचार केल्यास श्री. लाड यांनी दाखविल्याप्रमाणे ही भावगीतात्मक छाया जुन्या वैदिक-प्राकृत-भागवत वाङ्मयांत भरपूर आहे हें दिसेलच. पण ती भावगीतच्छाया आहे. त्यांत Lyrical touch किंवा Lyrical outburst क्वचित् आढळेल; तरी तें ‘भावगीत’ या प्रकारांत बसण्याअितकें विशिष्ट स्वरूपाचें नसेल. ज्या स्वरूपांत ‘भावगीतप्रकार’ आपल्याकडे आज रूढ आहे त्या अर्थाने. ज्या पद्धतीने श्री. लाड यांनी ‘भावगीत’प्रकाराचें विवेचन केलें आहे त्या प्रकाराने जुन्या जाणत्या संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनी कांही या प्रस्तुत प्रकाराचें विवेचन केलें नाही.

म. सा. प. (१७-२-३)

अनुक्रमणिका

तो प्रकार जुन्या काळींहि आजच्यासारखाच स्वतंत्र स्वरूपांत अस्तित्वांत असता तर कांही तरी विवेचन वा वर्णन साहित्यशास्त्रीय ग्रंथांतून येतें. जेथे साहित्यज्ञांनी त्याला स्वतंत्र काव्य-प्रकार म्हणून स्थान दिलें नाही तेथे सामान्य माणसांनाहि हा प्रकार नवीन आहे असा भ्रम व्हावा यांत नवल नाही. मराठींत तर पूर्वी काव्यचर्चाहि झाली नाही तर या काव्यप्रकाराचा निर्देश तरी कसा व्हावा ?

'भावगीत' या संज्ञेच्या मागची भूमिका बारकाईने पाहिली तर खरोखर परकीपणा घालविण्याचाच प्रकार त्यांत आहे असें आढळून येईल. प्रथम 'वैणिक', 'वीणाकाव्य' असे शब्द योजले गेले. पण त्यांतील वीणा शब्दावरून ध्वनित केलेल्या Lyre स्वरूपाची परंपरा या गीतांच्याबाबत आपल्याकडे नव्हती; सध्या ती पश्चिमेकडेहि नाही; आणि केवळ साहचर्य-गुणाने 'वीणा' हें वाद्य कांही ''भावगीत'प्रकाराची व्याख्या करतांना जरूर असलेला 'असाधारण धर्म' होऊं शकत नाही. या गोष्टी लक्षांत घेऊनच त्याचें हें लोकभ्रमाचें नांव मुकर झालें. यांत आपल्या परंपरेला डावलण्याचा 'भ्रमात्मक' प्रकार संभवत नाही. अशा तऱ्हेनें जुळवलेल्या या शब्दाने 'वैणिका'दि शब्द मागे टाकले, तो साहित्याने आत्मसात् केला, आणि आता तर त्याने 'आकाशवाणी'च्या साहाय्याने मरमासुरासारखा धुमाकूळ मांडला आहे. या शब्दाने बाकीच्यांना तर चकविलेंच, पण श्री. लाडांसारख्या 'मुक्तक' शब्दाच्या हिमायती पंडितालाहि चांगलेंच बनविलें आहे. मोक्याच्या नऊ-दहा ठिकाणीं हा परकी परं-परेचा शब्दच ठाण मांडून बसला आहे—आणि तोहि पूर्वपक्ष मांडतांना नव्हे तर उत्तर-पक्षाची सर्वसाधारण चर्चा चालू असतांना. विशेषतः 'प्राकृत कवींचीं भावगीतें' (पृ. ७४) 'उत्तम भावगीताची पराकोटि' (पृ. ७६) 'स्फुट भावगीता'स लिंगदेह म्हणावें' (पृ. ७८) असे उल्लेख पाहिले म्हणजे या जुन्याच्या अभिमानी पंडिताच्या परिमापेवरहि या नव्या ''परंपरेचीं प्रावरणें'' किती जाड पडलीं आहेत तें दिसून येईल. निदान प्राचीन प्राकृत 'गाथां'चा विचार करतांना श्री. लाड यांनी परकी भावगीत या संज्ञेचा अवलंब करावयाचा नव्हता. इतर ठिकाणींहि असेंच झालें आहे. उदा० 'काव्य' जेव्हा खरोखर गीत असेल, राग-दारीनें गातां येत असेल तेव्हाच त्याला उद्देशून 'भावगीत' हा शब्द वापरावा'. मुक्तक शब्द सुचविण्याच्या आधीचे हे प्रयोग आहेत म्हणून भावगीत शब्दच योजला असें याचें समर्थन होणें शक्य आहे; तथापि तो शब्द सुचविल्यानंतरहि 'मुक्तकें म्हणजेच प्रासंगिक स्फुट कविता असा संकेत ठरवून त्यांतलें सन्मौक्तिक तें भावगीत मानावें' असा नियम ते घालून देतात.

'मुक्तक' या जुन्या संज्ञेचा अर्थ निश्चित आहे. त्यांनीच सांगितलेल्या 'स्फुट प्रासंगिक श्लोक' या अर्थाने तो अजूनहि गुजराती भाषेंत रूढ आहे. 'मुक्तकां'त भावच्छटा आहे, पण भावोत्कटता असलीच पाहिजे असा दंडक नाही. उलट सर्व Lyric चा प्राणच भावतत्त्व आहे. या मुक्तकांचें महत्त्व पूर्वीहि फार मोठें मानलें होतें. अमरु कवीच्या एकेका श्लोकाची किंमत शेकडो प्रबंधकाव्यांइतकी मानली गेली. त्यांत रसतत्त्व अभिप्रेत असलें, तरी भावोत्कटता अनिवार्य मानली जात नसे. गीतगोविन्दासारखें भावगीतात्मक काव्यसुद्धा 'मुक्तक' होत नाही. यावरून 'मुक्तका'ची मर्यादा कळून येईल. 'मुक्तक' शब्द नवीन संज्ञा म्हणून वापरून पाहावा पाहिजे तर. पण त्यांतहि नवीन अर्थ घालून संकेत नव्याने ठरविण्याचा प्रसंग नसता तर बरें झालें असतें. नवीन वाटणाऱ्या काव्यप्रकाराला जुना शब्द जशाच्या तसा तंतोतंत अर्थशः जुळणारा असता, तर फक्त वापरावयास काढणें एवढेंच शिल्लक राहतें. 'मुक्तका'च्या कल्पनेंत केवळ बाह्य रूपाला प्राधान्य होतें; म्हणजे सुटा स्वतंत्र असा श्लोक

असणें अेवढेंच पुरें असे. अर्थदृष्ट्याहि स्वतंत्रपणावरच भर असे. त्यांतील भावोत्कटतेसंबंधी किंवा प्रचीतीच्या अेकत्वासंबंधी किंवा गेयतेसंबंधी कांहीच अुल्लेख पूर्वीच्या लोकांनी केलेले नाहीत. हाहि अर्थ त्यांत घालावयाचा हें नव्याने केलें पाहिजे. म्हणजे वस्तुतः त्याचा प्राणच त्यांत नव्याने घालावयाचा असें आहे. तेव्हा 'भावगीत' शब्दाला हा जो अर्थ आज आला आहे तो अर्थ 'मुक्तका'ला पूर्वी नसतांना आणण्याचा हा खटाटोप केवळ शब्द जुना आहे अेवढ्याकरिताच व्हावयाचा. तो यशस्वी होअील की नाही याबद्दल शंका वाटते. खरोखर 'भावगीत' शब्द रूढ करण्यांत व वापरण्यांत परक्यांच्या अंधानुकरणाची वृत्ति नाही. 'वैणिक किंवा वीणाकाव्य' म्हणण्यांत होती.

श्री. लाड यांच्या निबंधांत विवाद्य मुद्दे अेवढेच. बाकी सर्व निबंध साहित्यरसाने ओथंबलेला आहे. "प्रचीति, प्रक्षोभ, प्रसाद, प्रतिमा, प्रयत्न" या पांच 'प्र'कारांची सूत्रबद्ध मांडणी, आदिकवि वाल्मीकीच्या 'मा निषाद प्रतिष्ठां' इ० भावपूर्ण श्लोकाचें रसग्रहण आणि महाकाव्य व भावगीत यांतील फरक दाखवितांना वापरलेली विरोधोक्तींची (Antithesis) समतोल वाक्यरचना यांसारखे अव्वल दर्जाचे परिच्छेद या निबंधांत बरेच आहेत. अेकंदरीने समग्र काव्यनिर्मितीचें मानसशास्त्र अुत्तम रीतीने मांडलें गेलें आहे असें अभ्यासकांचें मत होअील असाच हा निबंध आहे; आणि ज्या मूलगामी अैतिहासिक दृष्टीने व मधुकरवृत्तीने यांतील विवेचन केलें आहे त्या वृत्तीबाबत तो जवळ जवळ अद्वितीय ठरेल यांत शंका नाही.

---

## हरि पंडित–थोडा खुलासा

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या ६९ व्या अंकांत (पौष १८६५ शक.) माझे वृद्ध मित्र प्रा. चिं. नी. जोशी यांचा 'हरिपंडितकृत भावबोधिनी' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. वरील लेख लिहिण्यापूर्वी सह्याद्रि मासिकाच्या अि. १९३८ मार्च व जून अशा दोन महिन्यांच्या अंकांत हरि दीक्षितांसंबंधी लेख आले आहेत ते प्रा. जोशी यांच्या अवलोकनांत आले नसावे असें वाटतें. मार्चच्या अंकांत वामनाच्या नांवावर मोडलीं जाणारीं शतकत्रय, भीष्मयुद्ध, विराटपर्व अित्यादि अनेक लहान मोठीं मराठी काव्यें वस्तुतः वामनाचीं नसून हरि दीक्षितांचीं आहेत. तसेंच या दीक्षितांचें कुलदैवत नृसिंह, आअीबाप लक्ष्मी व नृहरि–नरहरि–नारसिंह, गुरु वामन, गोत्र शांडिल्य येवढीच माहिती अुपलब्ध आहे असें निदर्शनास आणलें आहे. जूनच्या अंकांत अि. १७३३ ते ३६ च्या सुमारास नरगुंद येथे हरि यज्वा किंवा दीक्षित अथवा पंडित होअून गेले असून त्यांचे आअीबाप लक्ष्मी व नृसिंह अगर नरहरि, आडनांव नीलकंठे, गोत्र शांडिल्य व कुलदैवत नृसिंह होते; त्यांनी ब्रह्मसूत्रावर ब्रह्मसूत्रवृत्ति, भगवद्गीतेवर मितभाषिणी, शिवगीतेवर बालानंदिनी हे टीकाग्रंथ आणि विवेकमिहिर व नृसिंह हे नाट्यग्रंथ लिहिले आहेत; त्यांचे वंशज नरगुंद येथेच मुख्यतः अजूनहि राहतात; शतकत्रयादि प्रकरणांचे कर्ते हरि दीक्षित आणि अुपर्युक्त टीकाग्रंथ

अनुक्रमणिका

करणारे हरि दीक्षित अेकच असावे; असें प्रतिपादन केलें आहे. माझे मित्र प्रा. जोशी यांच्या लेखाने दोन्ही हरि दीक्षित अेकच असावेत या तर्कास पुष्टि मिळत आहे. हरि दीक्षित नरगुंदचे राहणारे हें त्यांस दिलेल्या अिनाम गांवाच्या सनदेवरूनच सिद्ध होत आहे. भावबोधिनींत आलेल्या मन्मथ संवत्सराच्या अुल्लेखावरून हरि दीक्षितांचा काळ श. १६३७ (अि.१७१५) पर्यंत मागे जातो. हरि दीक्षितांचें अुपनांव मात्र पंडित नव्हे, सनदेंत आल्या-प्रमाणे नीलकंठेच धरिलें पाहिजे. भावबोधिनीची माहिती अजेडांत येण्यापूर्वी हरि दीक्षित व त्यांचे गुरु वामन यांमध्ये कालदृष्ट्या बरेंच अंतर पडत होतें तेंहि आता कमी झालें आहे.

मा.अि.सं.मंडळ, पुणें २ — **गणेश हरि खरे**

---

## स्त्रियांच्या म्हणी

(६६ व्या अंकावरून पुढे)

(६७८) आळणी खाते, फोडणीची चव सांगते.
(६७९) शहाणा अडतो, पोहणारा बुडतो.
(६८०) मले मले गेले गोते खात, झिंजुरटें म्हणतें माझी काय वाट !
(६८१) मला नाही अब्रू, कशाला घाबरूं !
(६८२) भिऊन वागे, त्याच्या पाठीं म्हसोबा लागे.
(६८३) घडा गेल्याची फिकीर नाही पण पासंगाशी भांडण.
(६८४) सणांत पाहुणा केरासमान.
(६८५) हलकटाला दिला हिसका, तो म्हणतो मला जो जो केलें.
(६८६) पाहुणा आला घरीं, नी भीक मागे दारी.
(६८७) साधुसंतांच्या अैके कथा, आओबापास देअी लाथा.
(६८८) खाल्या भूक बहु, न्हाल्या मळ बहु.
(६८९) घेअी देअी ती गोमटी, नाही देअी ती हिमटी.
(६९०) केस दोराने बांधशील, जीभ कशाने बांधशील !
(६९१) हजारांत दाता, लक्षांत पतिव्रता.
(६९२) मढें गेलें मसणांत, नाही त्याची वासना.
(६९३) बाजारांत मारलें, घरीं सांगूं नका.
(६९४) अर्थावीण पोथी, नाकावीण मोती.
(६९५) माल तसं मोल.
(६९६) गाढवा, खा रे गहू, गाढव म्हणतें माझी हरळी मऊ.
(६९७) भिकारी तर भिकारी, घरादाराची चौकशी करी.
(६९८) भूपण मारी, टोणगे दारीं.

**नीळकंठ शंकर नवरे**

अनुक्रमणिका

# परीक्षणें



## साहित्यशास्त्र आणि टीका

१ सौंदर्यशोध व आनंदबोध— ले० रा. श्री. जोग, प्रका० देशमुख आणि कं., मूल्य रु. ८.

२ रसवंतीची जन्मकथा— ले० व प्रका० श्री. म. माटे.

३ तुषार— ले० द. सी. पंगु, प्रका० दा. ना. मोघे, मूल्य रु. २।।.

४ परामर्श— ले० ग. त्र्यं. माडखोलकर, प्रका० दि. मा. घुमाळ, मूल्य रु. ३.

५ सावरकरकाव्यसमालोचन— सं० वा. गो. मायदेव, प्रका० ढवळे आणि कं., मूल्य रु. २.

— १ —

अभिनवकाव्यप्रकाश या ग्रंथाचे लेखक म्हणून प्रा. जोग यांनी जी कीर्ति संपादन केली होती तीमध्ये प्रस्तुतचा ग्रंथ लिहून त्यांनी मोठी भर टाकली आहे. अभिनवकाव्यप्रकाश हा ग्रंथ त्याच्या नांवानेच सूचित केल्याप्रमाणे संस्कृत भाषेतील काव्यशास्त्रीय प्रमेयांचें विवरण आणि विवेचन करणारा होता तर प्रस्तुतचा ग्रंथ हा प्राधान्यानें पाश्चात्त्य सौंदर्यशास्त्रांतर्गत प्रमेयांचा संग्रह आणि समीक्षा यांना वाहिलेला आहे. काव्यांतील सौंदर्याची प्रौढ चर्चा जशी संस्कृत ग्रंथकारांनी केलेली आहे तशी सर्व ललितकलांत आणि निसर्गांतहि विलसणारें जें सौंदर्य त्याची चर्चा त्यांनी केलेली आढळत नाहीं. वास्तु, शिल्प, चित्र, गायन वगैरे ललितकलांची जोपासना आपल्याकडे उत्तम झाली. त्या त्या कलावंतांना उपयोगी पडतील असे कलानिर्मितीचे नियम बांधून देणारे मयमत, शिल्परत्न, प्रतिमान, लक्षण वगैरे ग्रंथहि झाले पण काव्यांतील सौंदर्याची चिकित्सा जशी तात्त्विक भूमिकेवरून करण्यांत आली तशा प्रकारची प्रौढ चर्चा सौंदर्यशास्त्राच्या वांत्र्यास आपणांकडे आलेली नव्हती. तिची विशेष जोपासना पाश्चात्त्य ग्रंथकारांनी केलेली आहे. ती मराठीमध्ये येणें जरूर होतें. तशा प्रकारचे पहिले प्रयत्न यापूर्वी गो. चि. भाटे व वा. गो. आपटे यांनी केले. त्यापेक्षा अधिक प्रौढ व भरघोस असें विवेचन प्रस्तुत ग्रंथांत आलें आहे.

ग्रंथाचें नांव सौंदर्यशोध व आनंदबोध असें असून सौंदर्यशोधाचा पहिला विभाग व आनंदबोधाचा दुसरा विभाग असे भाग पाडले आहेत. पैकी सौंदर्यशोधांत निष्पन्न काय होतें याकडे प्रथम वळूं.

तिकडे वळतांच अगदी उंबरठ्यावरच ज्या प्रश्नाची गांठ पडते तो प्रश्न म्हणजे सौंदर्य हें वस्तुगत असतें की मनोगत असतें हा होय, आणि ग्रंथकारानेहि त्याची प्रवेशद्वारींच चर्चा केली आहे. त्याच्या मतें "सौंदर्यनिश्चितीची मूलग्राही कसोटी व्यक्तिनिष्ठ होय, कारण वस्तु सुंदर कीं असुंदर याचा निकाल तिजकडे पाहतांच तत्काल आपलें मन देत असतें. तिच्यांतील सौंदर्यघटक कोणते ह्याचें पृथक्करण मागाहून करण्यांत येतें. पण सौंदर्याची कसोटी व्यक्तिनिष्ठ असली तरी सौंदर्य व्यक्तिनिष्ठ असण्याचें कारण नाहीं." सौंदर्याच्या कल्पना स्थलकालपरत्वें बदलतांना आढळतात. वेषभूषेंत निरनिराळे फरक होत असतात हें अेक ठळक परिचयाचें अुदाहरण होय, आणि सौंदर्याच्या घटकांत नावीन्याचा समावेश करावा लागतो

हा दुसरा पुरावा होय. म्हणून कांहींच्या मतें सौंदर्य हा वस्तूचा गुण नसून सर्वस्वीं पाहणाराच्या मनोवृत्तीचा तो अेक व्यापार असावा. यावर ग्रंथकार अशी फोड करतो की 'सौंदर्य हें वस्तुगत असलें तरी त्याची अनुभूति व्यक्तिगत असते. सौंदर्याच्या अनुभूतीला दोन गोष्टींची आवश्यकता असते. वस्तु आणि व्यक्ति. वस्तुसौंदर्य आणि व्यक्तिरसिकता या दोहोंचा गुणाकार म्हणजे सौंदर्यानुभूति होय. सौंदर्य म्हणजे वस्तूचें रंगरूप असेंच नसलें तरी पाहणाराच्या मनावर कांही अनुकूल परिणाम घडवून आणण्याचें वस्तूचें सामर्थ्य हें होय. हें सामर्थ्य तिच्यामध्ये अनेक गुणांमुळे अुत्पन्न होतें. व्यक्तीने तिच्याकडे पाहिलें नाही म्हणून हे गुण तिच्यामध्ये नाहीत असें होत नाही. तेव्हा अेखाद्या वस्तूचें सौंदर्य सापेक्षतः स्थिर असूनहि त्याची अनुभूति घेणाराच्या मनांत भेद, विकार अथवा अस्थिरता असते म्हणून त्याची अनुभूति व्यक्तिपरत्वें भिन्न भिन्न असते. वस्तूमधील सौंदर्य हें केवळ व्यक्तीकडून अध्यारोपित असतें तर कुब्जेच्या ठिकाणीं रंभेचा अनुभव घेणें शक्य होअून मानवाचें ब्ररेंचसें दुःख नाहीसें झालें असतें' (पृ. १९). तात्पर्य, सौंदर्याच्या विवेचनांत रंगरूपादि वस्तुनिष्ठ गुण व त्यांचा आस्वाद घेणारी रसिक अनुकूल मनोवृत्ति या दोहोंचा विचार करावा लागतो याकडे ग्रंथकाराने योग्य तें लक्ष वेधलें आहे.

सौंदर्य हें वस्तुनिष्ठ आणि त्याची कसोटी ही व्यक्तिनिष्ठ याचा थोडा अधिक खुलासा करणें जरूर आहे. वस्तूंतील ज्या गुणाचा मनावर विशिष्ट प्रकारचा आल्हाददायक परिणाम होतो त्या गुणसमुच्चयास सौंदर्य हें नांव देण्यांत येतें. वस्तूचें प्रमाण, आकार, रंग हीं वस्तूच्या अंगचींच असतात तीं आपण मनाने आरोपित करीत नाही. या अर्थी सौंदर्य हें वस्तुगत होय. पण या ठिकाणीं कांही तत्त्वज्ञानी विचारतात की मनाने आरोपित करीत नाही हें कशावरून? आकार, रंग तर जाअूंच द्या पण मूळ वस्तूच आपण मनाने कल्पित नाही हें कशावरून? स्वप्नांत सर्व वस्तु कल्पितोंच ना? त्या स्वप्नांतून जागें झाल्यावर आपण त्यास स्वप्न म्हणतो तसें आपलें सर्वच जीवित, सर्वच अनुभूति या स्वप्नमय नसतील कशावरून? ज्याला आपण स्वप्न म्हणतों तें अल्पकाल टिकणारें असेल तर हें स्वप्न दीर्घकाल टिकणारें कां असूं नये? आणि तसें असेल तर वस्तूहि मनःकल्पित आणि तिची सुरूपता आणि कुरूपता हीहि मनःकल्पित असेंच मानावें नाही का लागणार? या विचारसरणीस अुत्तर असें की सर्वच जीवित हें महास्वप्न आहे या प्रमेयाचें मंडन आणि खंडन दोन्ही करतां येणार नाही. तें स्वप्न असूं शकेल वा नसेल. तें ठरवावयास या स्वप्नांतून जागा झालेला कोणी मुक्तच हवा. त्याने हें सर्व स्वप्न म्हणून सांगितलें तर त्याच्या शब्दावर श्रद्धा ठेवणें अेवढाच मार्ग अुरतो. स्वप्न आहे हा पक्ष घेतला तरी या दीर्घ स्वप्नांतील सौंदर्यानुभवाचीच मीमांसा आपणांस कर्तव्य आहे असें म्हटलें म्हणजे झालें. ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या या भूमिकेवरून जगताचा निरास करणारें किंवा त्याच्या अंतिम सत्यस्वरूपाचा ठाव घेणारें अध्यात्मशास्त्र सोडलें तर बाकी सर्व शास्त्रें हीं या स्वप्नमय जगाच्या विविध रूपांचीच मीमांसा करीत असतात. स्वप्नमय असलें तरी या जगांत नियमबद्धता आहे. ती नियमबद्धताहि मनाच्या नियमबद्धतेचा आरोप असूं शकेल, पण आपला सर्व व्यवहार या नियमबद्धतेला अनुलक्षून असल्याने त्याची मीमांसा करणें अवश्य आहे. खुद्द मन हेंच जडांतून अुत्क्रांत झालें आहे हा शास्त्रज्ञांचा पक्ष घेतला तर बाह्य सृष्टीला स्वतंत्र असें अस्तित्व मान्य करावें लागेल व आकार, रंग अित्यादि गुण हे वस्तूच्या अंगचे गुण म्हणजे रंगरूपादिकांची प्रतिक्रिया मनांत उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असलेले म्हणून स्पष्ट म्हणावयास प्रत्यवाय राहणार नाही. आस्वाद घेणारा आणि आस्वादाचा विषय बाह्य वस्तु हें द्वैत स्वीकारल्यावरच

मीमांसा प्रवृत्त होते. हें द्वैत अंतिम सत्याच्या दृष्टीने मान्य करावयाचें असेंहि नाही. कोणत्यातरी विषयाचा आस्वाद घेत नसलेल्या अशा निर्लेप निरंजन अवस्थेचें भान आपणांस होत नाही. प्रत्येकाला स्वतःची जाणीव होते ती ज्ञानक्रिया चालू असतांनाच, 'मी' ची जाणीव होते ती मी अमुक करतों आहें– कांही तरी पाहतों आहें, विचार करतों आहें—अशा प्रकारची म्हणजे या जाणिवेंत मी, माझी क्रिया व त्या क्रियेचा विषय ही त्रिपुटी अवश्य अुपस्थित असते. हीं तिन्ही विषयविवेचनाच्या दृष्टीने अलग काढलीं तरी तीं ज्ञानक्रियेमध्ये अेकमेकांशी पूर्ण संबद्ध अशीं असतात. कोणतीहि क्रिया चालू नाही अशा वेळीं 'मी'चें 'अहं'चें आपणांस भानच होत नाही. असें जर आहे तर क्रिया आणि विषय यांशिवाय स्वतंत्र असा 'मी' मानाच कशाला? तो मानावयाचा तो तशा प्रकारचें स्वतंत्रपणाचें भान होतें म्हणून. क्रिया चालू असतां मी अमुक करतों असें क्रिया आणि तिचा विषय याचें स्वतंत्र भान असतें म्हणून. त्या मानाचा अनुभव सार्वत्रिक आहे. मुक्त स्थितींत संपूर्ण अद्वैताचा अनुभव असल्यास त्याचा अनुभव फक्त मुक्तास. 'त्याचा' 'अनुभव' असे द्वैती शब्द देखील तेथे लंगडे पडतात. पण तो साक्षात्काराचा व श्रद्धेचा विषय होय. अेरवींच्या आपल्या स्थितींत द्वैताचा अनुभव रोख आहे व विश्वाच्या अंतिम स्वरूपाचा निर्णय करूं पाहणारें अध्यात्मशास्त्र सोडून बाकीचीं सर्व शास्त्रें या सार्वत्रिक द्वैती अनुभवाच्या भूमिकेवरूनच आपला संसार थाटीत असतात. सौंदर्यमीमांसा हीहि याला अपवाद नाही. या द्वैती भूमिकेवरूनच 'सौंदर्य हें वस्तुनिष्ठ पण त्याची कसोटी व्यक्तिनिष्ठ' हें सूत्र मांडलें जाअूं शकतें.

—×—

— २ —

तेव्हा वस्तूला स्वतंत्र अस्तित्व आहे व तिचे परिमाण, आकार, रंग हे गुण म्हणजे मनावर ते ते परिणाम करण्याचे सामर्थ्यवान स्वयंभू असे वस्तुगतच आहेत, मानवी मनाने तिच्यावर आरोपित केलेले नव्हेत, अशी भूमिका प्रथम स्पष्ट करूनच पुढे वळलें पाहिजे. ही भूमिका स्पष्ट झाल्यावर मग प्रश्न असा सुचतो की वस्तूचा आकार, रंग वगैरे वस्तुगत असलीं तरी त्यांतील सौंदर्य वा कुरूपतादिहि वस्तुगत असतात काय?

सौंदर्य हें वस्तुगत असें नुसतें म्हटल्याने सौंदर्य हा वस्तूचा गुण, स्वतःसिद्ध गुण, होय असें म्हटल्यासारखें होतें. म्हणजे निसर्गातच सुंदर आणि असुंदर वस्तु निर्माण करण्याची कांही नैसर्गिक योजना आहे की काय असा संशय येतो. पान ५९ वर बफियर याची जी विचारसरणी अुद्धृत करण्यांत आली आहे तीवरून बफियरला तरी असें कांही प्रतिपादन करावयाचें आहे असा ग्रह होतो. तो लिहितो, 'असंख्य मानवी चेहेऱ्यांमध्ये अेखादाच नमुनेदार सुंदर असतो. बाकीचे सरेच मानवी चेहरे या अेका नमुन्याबरहुकूम करण्याचा निसर्गाचा प्रयत्न असतो.' जोगांना ही विचारसरणी मान्य आहे की नाही कळत नाही. ते येवढेंच लिहितात की "बफियरच्या साऱ्या विचारांशीं जरी वाचकाचें अेकमत झालें नाही तरी अनेकांतील अेकत्व स्पष्ट करण्याच्या दृष्टीने त्याचा हा प्रयत्न चांगला झाला." विश्वांतील हरअेक वस्तूंचा अेक अमूर्त आदर्श नमुना जड सृष्टीच्या आधीच स्वयंभू असतो व त्या नमुन्याबरहुकूम विश्वांतील वस्तूंना आकार येत असतो या प्लेटोच्या विचारसरणीचा पगडा बफियरच्या मनावर बसलेला दिसतो. पण असे आदर्श नमुने असतात याला कांही पुरावा आहे काय?

आदर्श नमुन्याबरहुकूम वस्तु निर्माण करण्याचा निसर्गाचा प्रयत्न असतो या विधानाला शास्त्रीय पुरावा कोणता ? नकटें नाक आणि चाफेकळी नाक हीं दोन्हीं निसर्गच निर्माण करितो. निसर्ग हा नेहमीं चाफेकळी नाकच तयार करण्याचा प्रयत्न करतो पण तो फसला म्हणजे नकटें नाक तयार होतें असें विधान करण्यास कांही पुरावा आहे का ? सुंदर व असुंदर ह्या मानवाच्या आवडीनिवडी होत; निसर्गाच्या नव्हत. सौंदर्यनिर्मितीकडे निसर्गाचा कल आहे असें म्हणावें तर उत्क्रांतिपट पाहिला असतां उत्तरकालीन प्राणी हे पूर्वकालीनांपेक्षा अधिक सुंदर बनत चालले आहेत असें कांही आढळत नाही. निसर्ग हा मंगलमय आहे, न्यायी आहे, अपूर्णातून पूर्णत्वाकडे जात आहे वगैरे ज्या कांही आशाबद्ध पण असिद्ध अशा कल्पना मांडल्या गेल्या आहेत त्यांपैकीच प्लेटो व ब्रफियर यांच्या वरील कल्पना होत. अर्थात् सौंदर्य व कुरूपता यांचीं बीजें स्वतंत्रपणें निसर्गातच आहेत असें मानतां येत नाही. उंटाचें रूप आणि घोड्याचें रूप निसर्गतःच तयार होतें. निसर्गाच्या दृष्टीने एक वाईटहि नाही आणि दुसरें चांगलेंहि नाही. तें चांगलें आणि वाईट हें पाहणाराच्या दृष्टीने. उंटाचा आकार आणि घोड्याचा आकार हे निसर्गतःच सिद्ध असतात. ते मनानें आपण कल्पित नाही. पण घोड्याला सुंदर म्हणतों व उंटाला (अहोरूपमहोध्वनिः या वचनांत सूचित केल्याप्रमाणे) कुरूप म्हणतों तें मात्र आपल्या मनाप्रमाणे.

मनाप्रमाणे म्हणजे मनःकल्पित लहरीप्रमाणे मात्र नव्हे. स्थलकालव्यक्तिपरत्वें आवडनिवड कांही प्रमाणांत बदलत असली तरी या वरवरच्या उथळ लहरीखालील मानवी मनाची व इंद्रियाची घडण ही सर्वत्र एकरूप आहे. तशी नसेल तर सौंदर्यमीमांसेला स्थानच उरणार नाही. वाल्मीकि आणि शेक्सपिअर यांचें काव्य भिन्नकालीन व भिन्नस्थलीन सर्व रसिकांना मुलवितें आणि प्रभातकालीन उषेचें गुलाबी सौंदर्य वैदिक काळच्या ऋषीप्रमाणेंच आजच्या रसिकांसहि मोहून टाकतें. अर्थात् ही जी आंतरिक एकरूपता अखिल मानवी समाजाला व्यापून राहिली आहे तीवर सौंदर्यमीमांसेंत भर दिला पाहिजे. ही आंतरिक एकरूपता असल्यामुळेच त्या त्या वस्तूचे परिणाम एकंदरीने निश्चित असे होतात व या निश्चिततेमुळे त्या त्या वस्तूला सुंदर व असुंदर असें म्हणण्यांत येतें. बाह्य वस्तूचे आकारप्रमाणादि गुण अविकृत राहिले तरी मानवी मनाची आवड बदलेल तर त्या गुणांचें सौंदर्य अथवा अनुकूल परिणामकारकत्व बदलेल. यामुळेच बाह्य वस्तुनिष्ठ गुणांपेक्षा मनाच्या आवडीला आणि इंद्रियाच्या संवेदनक्षमतेला अधिक महत्त्व दिलें पाहिजे. सौंदर्यांत नावीन्याचा अन्तर्भाव करितांना हा मुद्दा स्पष्ट होतो. एकच वस्तु मोहक असली तरी सारखी पाहत वा चिंतीत बसल्याने इंद्रियांना आणि मनाला शीण येतो. या ठिकाणीं वस्तुनिष्ठ गुण कायम असतात, पण मनाला व इंद्रियांना शीण आलेला असल्याने पूर्वीच्याच वस्तूचें सौंदर्य विटूं लागतें.

अखिल मानवजातीच्या मनाची आणि इंद्रियाची घडण एकरूप असते असें वर म्हटलें पण त्याहि विधानाला पुस्ती जोडली पाहिजे. मानवी प्राण्याच्या विकासांत इंद्रियांच्या मूळच्या घडणींत फारसा फरक पडलेला नाही. पण मनाच्या आवडीनिवडी कांही प्रमाणांत बदलत आल्या आहेत. काव्याच्या आस्वादाच्या बाबतींत हा मुद्दा स्पष्ट होतो. माणसाच्या मूलभूत प्रेरणा कायम असल्या तरी समाजाच्या विकासाला अनुकूल अशी त्यांची नवी संघटना मानव बनवीत आला आहे. म्हणूनच शुद्ध शारीरिक शृंगारापेक्षा गुणलुब्ध प्रेम अधिक आवडूं लागलें आहे व आतिथ्यधर्माच्या पालनाकरिता स्वतःच्या मुलाचें मांस रांधण्यास सिद्ध होणाऱ्या

श्रियाळमाता चांगुणेचें कथानक त्याला पूर्वीअितकें आवडत नाहींसें झालें आहे. सर्वस्वीं आवडत नाही असें मात्र नाही, कारण त्या कथेंतील त्यागाचें तत्त्व हें अजूनहि विटलेलें नाही.'

मूलभूत प्रेरणांच्या संघटनेचा मुद्दा निघाला आहे, तेव्हा हेंहि सांगितलें पाहिजे की आनंदाच्या मीमांसेंत समधाततेला जें महत्त्व रिचर्डसने दिलें आहे तें वस्तुतः या संघटनेस दिलें पाहिजे. संस्कृतीच्या विकासांत मानवसमाज हा आपल्या अुपजत प्रेरणा व त्यांशीं संलग्न असणाऱ्या भावना यांची बुद्धिपुरःसर विशिष्ट अशी घटना बनवीत आला आहे. देशप्रेम हें अशाच बुद्धिपुरःसर बनविलेल्या भावबंधाचें अुदाहरण होय. अशा ज्या संघटना असतील त्या दृढ करणारें जें काव्य तें सुंदर काव्य होय. नुसता वृत्तीला समधातपणा आणणारें तें नव्हे तर अिष्ट अशा वृत्तींना बळकट करणारें, सुसंघटित करणारें, पीळदार करणारें, तें सुंदर होय.

समाधाततेच्या अुपपत्तींतील अडचणी जोगांनीहि दाखविल्या आहेत (पृ. २२१). ह्या समधाततेच्या अैवजी संघटनावर्धकता हा गुण मानला म्हणजे त्या अडचणींचा परिहार होअील. संघटनेमध्ये समधातता व अुत्कटता या दोन्हींचाहि प्रसंगपरत्वें समवेश होतो.

प्रमाणबद्धता, संगति वगैरे गुणांची आवड जी अविकृत आहे त्या आवडीचें मर्महि मानवी मनाच्या घडणीला या गोष्टी अनुकूल होत हें होय. वस्तूंचा फापटपसारा पाहिला म्हणजे मन गोंधळून जातें. पण या अनेकांतील अेकत्व त्याला आढळलें म्हणजे त्याचें नीट आकलन मन करूं शकतें. आकलन झालें म्हणजे स्मरणांत साठवूं शकतें, स्मरणांत पूर्वी असलेल्याशीं त्यांची सांगड घालतां येते म्हणजे त्यावर अेक प्रकारचा मनाचा कबजा प्रस्थापित होतो. **विस्कळित मांडणीपेक्षा सुसंघटित मांडणी सुंदर दिसते याचें कारण मानवी मनाची घटनाच तशी आहे म्हणून.** तात्पर्य, सौंदर्यमीमांसेंत मनाच्या या मूलभूत घटनेला योग्य तें महत्त्व दिलें पाहिजे.

बाह्यवस्तु ही मूलतः सुंदरहि नाहीं व असुंदरहि नाही. मनोव्यापारांच्या सुसंगत संघटनेला अनुकूल असलेल्यावर सुंदरतेचा आपण आरोप करीत असतों. म्हणजे वस्तूला सुंदर म्हणण्यांत येतें तें लाक्षणिक अर्थानें. मानवी अिंद्रियें व मन हरघडी बदलत नाहीं. म्हणून त्या त्या सुंदर वस्तूचा मनावर व अिंद्रियावर अनुकूल परिणाम करण्याचें सामर्थ्य कायम टिकतें. आणि यामुळे वस्तु ही मुळांतच सुंदर असते असें वाटूं लागतें. आकाररूपादि गुण वस्तूंतच असतात. म्हणजे ज्याचा परिणाम इंद्रियावर होतो तें जें कांही असेल ते 'वस्तूं'तच असतें. पण कोणता आकार सुंदर वाटावयाचा हें मनाच्या व अिंद्रियांच्या घडणीवर अवलंबून असतें.

—×—

— ३ —

सौंदर्यमीमांसेच्या प्रारंभींच हटकणाऱ्या प्रश्नाची ही चर्चा झाली. प्रवेश करून आंत गेल्यावर ग्रंथकाराने सौंदर्याच्या विविध घटकांची व्यवस्थित मांडणी केलेली आढळून येते. या घटकांची तीन कक्षांत विभागणी केली आहे. रूप, आकार रेखा वगैरे अिंद्रियगोचर घटक

हे पहिल्या कक्षेतले. या घटकांचे परस्परसंबंध म्हणजे साम्यविरोध, प्रमाणबद्धता, संगति, अेकरूपता हे द्वितीय कक्षेतील व केवळ बुद्धिग्राह्य म्हणजे स्वार्थनिरपेक्षता, सूचकता वगैरे तिसऱ्या कक्षेतील घटक होत. पैकी अिंद्रियग्राह्य गुणांच्या बाबतींत चक्षु आणि श्रोत्र या दोन गुणांचाच विचार करण्यांत येतो या पक्षपाताविरुद्ध जोगांनी केलेली तक्रार यथायोग्य आहे. ते लिहितात की "कर्णेंद्रिय व चक्षुरिंद्रिय यांचें तर्पण करणारांना मात्र सुंदर गणलें जावें व अितर प्रकारच्या अनुकूल संवेदना अुत्पन्न करणाऱ्या वस्तु ललितकलांचे विषय मानले जाअूं नयेत हा तत्त्वतः पक्षपात आहे; पण आजच्या सौंदर्यशास्त्रांत तो चालू आहे" (पृ. २३). जिव्हेचें तर्पण करणाऱ्या गोड साखरेला सुंदर कां म्हणूं नये? हिरवेंगार रान पाहिल्याने डोळ्यांना जसा आराम वाटतो तसें गार पाणी प्याल्याने शरीराला आराम वाटतो. फरक आहे तो येवढाच की अेकच देखावा अनेकांचें समाधान करूं शकतो तशी अेकच साखरेची चिमुट किंवा अेकच थंडगार पाण्याचा चुळका अनेकांचें समाधान करूं शकत नाही. पण या मुद्यावर सुगंधाला तरी सौंदर्य मान्य करावें. सुगंधाने अल्प प्रमाणांत भावजागृतीहि होते. तात्पर्य, सौंदर्यग्रहणाचीं अिंद्रियें नेत्र व कर्ण हीं दोनच मानणें हा अुघड पक्षपात असून तो तात्त्विक दृष्ट्या आपणांस मान्य करण्याचें कारण नाही.

तिसऱ्या कक्षेतील गुण जो निःस्वार्थता त्याचेंहि थोडें असेंच आहे. सुंदर देखावा पाहून आनंद होतो तो निःस्वार्थ असतो म्हणजे काय? म्हणजे त्या देखाव्याने पोट भरणार नसेल किंवा तो विकून दोन पैसे मिळणार नसतील पण त्या देखाव्याने अिंद्रियांचें तर्पण होतें ना? मग हा स्वार्थ नाही का? जोगांनी या निःस्वार्थीपणाच्या गुणाला हरकत घेतली आहे तीहि रास्त आहे. अिंद्रियग्राह्य सौंदर्यास्वाद हा **निःस्वार्थी** नसतो पण **स्वयंपूर्ण मात्र** असतो; म्हणजे ह्या आनंदांतच त्याची परिसमाप्ति होते. त्यापासून अितर आणखी कोणत्याहि अपेक्षा नसतात.

सौंदर्यघटकांच्या या चर्चेनंतर ग्रंथकार हा सौंदर्याबरोबर ज्याचा विचार करण्यांत येतो त्या **चित्र** व **भव्य** या कल्पनांच्याकडे वळला आहे. येथे अनेकांच्या मतांचा संग्रह करण्यांत आला आहे. त्यांत भव्याविषयी जार्डन् यांचें मत मोठें चमत्कारिक दिसतें. जोगांना तें मान्य आहे का नाही याचा कांहीच खुलासा नाही. ते येवढेच लिहितात की भव्यतेतील प्रचंडपणाच्या कल्पनेकडे जार्डन् थोड्याशा वेगळ्या दृष्टीने पाहतात. काय दिसलें या जार्डन्साहेबांना? तर वस्तूंचें द्रव्यमान व आकार हीं योग्य प्रमाणांत असलीं म्हणजे सौंदर्य निर्माण होतें, पण वस्तुमान हें अितर घटकांच्या मानाने फार मोठें मलतेंच असलें म्हणजे भव्य निर्माण होतें. अतअेव भव्य हें सुंदरतेपेक्षा विरूपतेला अधिक जवळ असतें (The sublime is closer in relation to the ugly than to the beautiful पृ. ८४) या मताला अनुभवाचा दुजोरा मिळत नाही. अेकामागे अेक अुंच अुंच होत जाणाऱ्या प्रचंड पर्वतश्रेणी, नजर ठरत नाही येथवर पसरलेला अफाट दर्या व अनंतत्वाचें प्रतीक वाटणारा गगनाचा विशाल घुमट हे विरूपतेशीं जुळणारे आहेत असें प्रतिपादन करणारी रसिकता संशयास्पद होय. या सर्व ठिकाणीं अितर घटकांपेक्षा वस्तुमान (mass) प्रमाणाबाहेर आहे हेंहि जार्डन्चें म्हणणें चूक होय. येथे वस्तुमानच तेवढें प्रचंड आहे असें नव्हे, तर आकार, रेखा सर्वच विशाल प्रमाणांत आहेत. प्रमाणबद्धता ढळली आहे असे नव्हे. भव्यतेचा हा जार्डन्ने केलेला खुलासा जोगांना मान्य आहे काय? गौडी व पांचाली या रीति असुंदराकडे झुकतात या विधानावरून (पृ. ९६) मान्यतेकडे त्यांचा कल झुकतोसा दिसतो. याच जार्डनने केलेला औचित्याचा खुलासाहि नीट नाही. आकार, रेखा, रूप वगैरेंचा योग्य मेळ औचित्यास धरून झाला म्हणजे सौंदर्य निष्पन्न

होतें हें ठीक, पण पुढे त्याचा खुलासा करितात तो असा की 'तांबडा रंग हा गुलाबाला योग्य किंवा अनुरूप आहे याचा अर्थ असा की गुलाबाचें फूल ही अेक अशी वस्तु आहे की तिला तांबडा रंग पाहिजे असतो. म्हणजे तांबडा रंग हा गुलाबाचा रंग आहे. परंतु तो तांबडा रंग आहे म्हणून गुलाबाचा रंग आहे. तो गुलाबाचा आणि त्या तांबड्या रंगाचा स्वभावच असा आहे की तीं अेकत्र असावीत.' या खुलाशाने वाचक गोंधळून मात्र जावयाचा. जार्डन्ने पिवळा गुलाब पाहिलाच नाही का? का तो पिवळा रंग अनुचित असतो?

मव्यतेविषयींचा जार्डनचा हा खुलासा सोडला तर औचित्य, वैचित्र्य, ध्वनि (सूचकता) या तत्त्वांचें संस्कृतकाव्यमीमांसकांनी जें विवेचन केलें आहे तें काव्याप्रमाणे इतर ललितकलांनाहि कसें लागू पडतें हें जोगांनी चांगलें दाखवून दिलें आहे. ध्वनीचें अुदाहरण देतांना संस्कृत ग्रंथकार 'चौर्यरतगोपनाचें' देतात. पण मराठी काव्यशास्त्राने ती प्रथा पुढें चालविण्याचें कारण नाही. (पृ. १०१). संस्कृत काव्यशास्त्रांतला तो लांछनास्पद भाग आहे. जोगांनी तसलें अुदाहरण घ्यावयास नको होतें असें मला वाटतें. दुसरें अुदाहरण दिलें आहे तेवढें पुरलें असतें.

औचित्य, वैचित्र्य, ध्वनि यांच्याप्रमाणे काव्यशास्त्रांतील रीतीची (वामनप्रणीत) व तदन्तर्गत गुणांची कल्पना वस्तुसौंदर्यास लावून दाखविण्याचाहि प्रयत्न केला आहे. तो पूर्णपणें साधलेला आहे असें म्हणवत नाहीं. मसृणत्व व smoothness, समता व समप्रमाणता, प्रसाद, साधेपणा अशा कांही जोड्या बसतात पण बाकीच्यांत ओढाताण करावी लागते. शिवाय कोठे शब्दगुण घ्यावा लागतो तर कोठे अर्थगुण घ्यावा लागतो. दुसरें असें की वामनाची रीतीची कल्पनाच मुळांत सदोष आहे. अर्थगुण जर लक्षांत घ्यावयाचे तर विशिष्ट पदरचना रीति अशी पदप्रधान व्याख्या करण्यांत स्वारस्य काय? ध्वन्यालोककाराच्या लक्षांत ही चूक येऊन केवळ शब्दयोजना किंवा अक्षरयोजना ही दाखविण्यास संघटना हा निराळा शब्द योजावा असे त्याने सुचविलें आहे. शिवाय सर्व गुण जिच्यांत आहेत ती वैदर्भी रीति ग्राह्य होय (वैदर्भी ग्राह्या गुणानां साकल्यात्) हें वामनाचें मतहि सदोष आहे. ओज प्रसाद कांति माधुर्य वगैरे सर्व गुण अेकाच काव्यांत पाहिजेत हें मत आग्रहमूलकच नव्हे, तर अशास्त्रीय होय. कारण ओज आणि माधुर्य यासारखे कांही गुण अेकत्र नांदणारहि नाहीत. येथेहि वामनाचा आश्रय न करितां ध्वन्यालोककाराचाच करणें रास्त झालें असतें. अन्यच जोगांनी तो तसा केला आहे व तेथे योग्य ती बाजू मांडली आहे. पृ. २५८ वर ध्वन्यालोककारांनी रसाचे दोन गट करून शृंगारादींत मनाची आर्द्रता असते तर रौद्रांत दीप्ति असते असें प्रतिपादल्याचा अुल्लेख केला आहे. तो लक्षांत घेतां वामनाच्या गुणसाकल्यप्रमेयावर जोगांनी आक्षेप घ्यावयास पाहिजे होता तो घेतलेला नाही. उलट 'वामनाने तीन रीति सांगितल्या त्यांतील अेकच सुंदर म्हणतां येईल. अितर दोन्हींमध्यें गुणसाकल्य नसल्याने त्या असुंदराकडे झुकतात' (पृ. ९६) असें विधान करून वामनाचा जोगांनी पाठपुरावा केला आहे तो योग्य वाटत नाही.

—×—

— ४ —

ग्रंथाचा अुत्तरभाग आनंदाच्या चर्चेस वाहिलेला आहे. त्याचा निष्कर्ष उपसंहारांत पुढीलप्रमाणें काढलेला आहे. "काव्याचा रसिकाच्या मनावर होणारा परिणाम अगदी साध्या चमत्कारापासून तो मनाच्या खोल खळबळीपर्यंत होणें शक्य आहे. या परिणामांत अनेक

घटक एकाच वेळीं उपस्थित असणें अगदी शक्य आहे. केव्हा त्यांत पुनःप्रत्ययाला प्राधान्य असेल, केव्हा प्रत्यभिज्ञेला असेल, केव्हा नवीन ज्ञान झाल्याने जिज्ञासु वृत्तीचें तर्पण असेल, केव्हा भय किंवा अनुकंपा या मनोविकारांना वाव मिळाल्याने भावनांच्या उपशमाचें समाधान असणेंहि अशक्य नाही. सारांश, सौंदर्य हा अनेक घटकांनी बनलेल्या निरनिराळ्या सौंदर्य-वस्तूंचा परिणाम असल्याने त्याचें स्वरूपहि अनेकविध आहे'' (पृ. २९८)

जोगांनी आपली भूमिका अशी विविध स्वरूप मानणारी स्पष्ट केली असतांहि ''समधात-तेची कल्पना मांडण्याकरितां त्यानी ग्रंथ लिहिला व प्रसंग येतांच त्या सिद्धांताची उचलबांगडी केली यावरून ग्रंथलेखनाची जबाबदारी त्यांना कळत नसावी'' असा डॉ. लवंदे यांनी विविध-वृत्तांतील लेखांत जो शेरा मारला आहे तो निराधार होय. अेकच अेक प्रकार मानल्याने जो ठस-ठशीतपणा येतो तसा अनेकविध मानल्याने येत नाही हें खरें; पण स्वरूप अेकरूप नसतां मानायचें कसें? आणि अनेकविध मानल्याने अुपपत्ति अपुरी पडते असें तरी कां मानावयाचें? जिज्ञासापूर्ति सुप्त अिच्छापूर्ति, भावनांचें अुन्नयन व संघटन, अनुकृतीच्या यथार्थदर्शनांतील कौशल्याने होणारा आनंद, असें आनंदाचें विविध स्वरूप असतां त्या सर्वांचा यांच्यांपैकी कोणत्या तरी अेका प्रकारांत समावेश कसा करितां येईल? या सर्व प्रकारांच्या तळाशीं असणारें आत्मविकास किंवा आत्मवर्चस्वलालसा असें तत्त्व सांगतां येअील. पण तें मांडलें तरी आनंदाच्या विविध प्रकारांचें पृथक्त्व राहीलच. ते निरनिराळे प्रकार त्यांच्यापैकीच कोणत्या तरी अेकांत मुरवून टाकतां येत नाहीत.

आनंदाचा आस्वाद घेण्यास तादात्म्याची जरुरी नाही, सह अनुभूति असली म्हणजे पुरे, असें ग्रंथकारांचें प्रतिपादन आहे. मी स्वतः सर्वच ठिकाणीं तादात्म्य मानीत नाही. सर्वच ठिकाणीं मानीत नसल्याने माझी भूमिका तितकीशी सुसंगत नाही असें ग्रंथकाराचें प्रतिपादन आहे (पृ. १८८). पण तादात्म्य मानलें तर तें सर्वच ठिकाणीं मानलें पाहिजे असा आग्रह असण्याचें कारण काय? तादात्म्यासंबंधी ग्रंथकार लिहितात की ''तादात्म्याचा संभव कोठे? रूप, गुण, परिस्थिति इत्यादि साऱ्या गोष्टी अगदी तंतोतंत आपल्याच असल्या तरच तादात्म्य नामक भ्रांति अुत्पन्न होअू शकेल. अितरथा नाही.'' (१८९) पण असलें संपूर्ण तादात्म्य-कोणींच प्रतिपादिलेलें नाही. म्हणूनच तादात्म्याला स्वायत्त हें विशेषण लावावें लागतें. म्हणजे स्वत्वाची संपूर्ण विस्मृति होण्याअितकें तादात्म्य नसतें. स्वायत्त तादात्म्याविषयी ग्रंथकार लिहितात की, 'आनंदास्वादापुरतें मात्र नायकाशीं तदात्म व्हावयाचें व दुःखाला सुरवात होते असें दिसतांच पळ काढावयाचा अशी ही स्वार्थी वृत्ति दिसते.' मीं प्रतिपादन केलें आहे तें दुःखाच्या प्रसंगींहि नायकाशीं तादात्म्य होतें असेंच केलें आहे. मात्र हें दुःख प्रत्यक्ष नसून काल्पनिक आहे याचा विसर पडत नाही. अत्यंत हळव्या मनाच्या माणसाला कल्पनेनेहि दुःखानुभव घेतां येत नाही. कारण त्याच्या मनावर ताबा नसतो, सुसंस्कृताचा असतो. संकटाचा आणि दुःखाचाहि अनुभव त्याचा फार चटका बसणार नाही अितक्या बेताने घेण्याची अिच्छा मानवी स्वभावांतच आहे. तशी परिस्थिती काव्य त्याला प्राप्त करून देतें. हें होण्यास कांही प्रमाणांत तादात्म्य अवश्य आहे. ताटस्थ्याने हा अनुभव चाखावयास कसा सांपडणार? ताटस्थ्य आणि तादात्म्य यांच्या मधली कोणती तरी अवस्था मानावी लागते. म्हणूनच ताटस्थ्याला सहानुभूतिपूर्ण व तादात्म्याला स्वायत्त अशीं विशेषणें जोडावीं लागतात. सहानुभूतीमध्ये देखील सहानुभूतिविषयाच्या ठायीं आपण असतों तर काय वाटलें असतें याची कल्पना येअून जातेच.

दोनतीन प्रमुख मुद्द्यांचा येथवर विचार केला. पुस्तकांत जो हरतऱ्हेचा मरगच असा तपशील आहे तो रसिकांनी मूळांतच पाहावा. शेवटीं पुनर्मुद्रणाच्या वेळीं अुपयोग व्हावा याकरिता अेक दोन किरकोळ पारिभाषिक शब्दांचा अुल्लेख करून आटोपतों. Mass याला कांहीं ठिकाणीं द्रव्य म्हटलें आहे (पृ. ४६, ६५), कांहीं ठिकाणीं द्रव्यमान म्हटलें आहे. तरी दुसराच शब्द योग्य. पान १५९ वर Adrenal gland मूत्राशयावर असतात असें विधान आहे तेथे मूत्रपिंड पाहिजे. Nerves याला प्रतिशब्द शिरा हा वापरला आहे त्याअैवजीं मज्जातंतु हा रूढ आहे. शिरा म्हणजे रक्तवाहिन्या.

द. के. केळकर

गेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष प्रा. श्री. म. माटे यांनी संमेलनाच्या वेळींच प्रसिद्ध केलेलें 'रसवंतीची जन्मकथा' हें पुस्तक म्हणजे काव्यावरील १८८ पानांचें अेक अखंड प्र-वचनच होय. 'गेयता हेंच अेक काव्याचें खरें म्हणजे व्यावर्तक लक्षण आहे' हें या प्रवचनाचें सार आहे. मुख्य प्रतिपाद्य हें अेवढेंच असल्याने पहिल्यापासून अखेरपर्यंत प्रकरण असें अेकच आहे. तदंतर्भूत बारीक मुद्दे विवेचनाच्या ओघांत अनेक आले असले तरी काव्याचें 'विशिष्ट', स्वतंत्र', निर्णायक', 'व्यवच्छेदक', अथवा 'व्यावर्तक' असें लक्षण म्हणजे गेयता हेंच जवळ जवळ पंचवीस ठिकाणीं 'आग्रहानें' किंवा 'आवर्जून' असें त्यांनी सांगितलें असल्याने तोच अेक महत्त्वाचा विचार या पुस्तकांत आला आहे असेंच म्हणावें लागतें.

काव्य हा अेक रसपूर्ण वाङ्मयाचा प्रकार आहे ही गोष्ट ग्रंथकर्त्यांस मान्य आहे. 'शुद्ध काव्य, म्हणजे ज्यांत मूळांत सुरस भावना, कल्पना, विचार अित्यादि आहेत व ज्यांचा रस गेयतेमुळे द्विगुणित झाला आहे' अशी शुद्ध काव्याची कल्पना त्यांनी पृ. १२०-२१ वर दिली आहे. तसेंच 'चाल चांगली असणें हा कवीच्या कवित्वाचा गुण नव्हे, तो संगीतज्ञानाचा गुण आहे' (पृ. १०७) किंवा 'सुस्वर चाल व म्हणणाऱ्याच्या गाण्याची गोडी हीं दोन कलमें वजा झालीं म्हणजे अुरतें तें कवीचें खरें खरें बळ होय (पृ. १०७) अशीं कवित्व व गेयता याविषयी आपलीं मतें त्यांनी सांगितलीं आहेत. तेव्हा सामान्य काव्यकल्पनेपेक्षा त्यांची काव्यकल्पना कांही वेगळीच आहे असें नाही. त्यांचा आग्रह आहे तो व्याख्या करण्याबाबत. व्याख्येंत गेयतेचा, आणि फक्त तिचाच, अंतर्भाव झाला पाहिजे; कारण गेयतेची अट नसल्यास गद्यहि काव्यांत येअील; तें येतां कामा नये, तीच खरी व्याख्या किंवा खरें लक्षण होय अशी त्यांची विचारसरणी आहे.

पण लक्षणाच्या व्यावर्तकत्वावरच त्यांनी भर दिला आहे. लक्षण व्यावर्तक असावें हें खरें. तथापि अितरव्यावर्तनाच्या आधी व्याख्येय वस्तूचें प्राणभूत तत्त्वहि त्यांत सांगितलेलें असावें असें आधुनिक लक्षणलक्षणकार सांगतात. गेयता ही लेखक म्हणतात त्याप्रमाणे काव्याची अविभाज्य सहचरी असली तरी प्राणभूत गुण नव्हे. तीमुळे मूळ अर्थ दुप्पट (पृ १४), तिप्पट (पृ १२३-२४) किंवा दसपट (पृ. ८९ व १२८) अितका सुरस झाला, किंवा ती गेयता आगंतुक नसली (पृ. १५५-५६) किंवा तीमुळे कवीच्या प्रतिभाचक्राला गति मिळत असली तरी ती काव्याचा गाभा (Essence) होअूं शकत नाही. त्याचा अुल्लेख झाला नाही तर काव्याची व्याख्याच होणार नाही. 'काव्याचा रसात्मकतेचा कस,' किंवा 'रसात्मकतेकडे आवर्जून लक्ष दिलें पाहिजे' (पृ. १८१) अित्यादि वाक्यखंडांवरून काव्याचें प्राणभूत सार कोणतें आहे याविषयी प्रा. माटे यांची कल्पना योग्यच आहे हें दिसेल. मात्र

ती व्याख्येंत आणण्याची त्यांची तयारी नाही. कारण व्याख्या करतांना त्यांचें सारें लक्ष व्यावर्तकत्वावर आहे.

ही गेयताहि सर्वस्वीं व्यावर्तक होअू शकत नाही याची जाणीव त्यांना नाही असें नाही. विष्णुसहस्रनाम किंवा व्याकरणकारिका हीं अुदाहरणें त्यांनीच दिलीं आहेत. हें लेखन पद्यबद्ध व म्हणून गेय आहे म्हणून त्याला हट्टाने काव्य म्हटलें तरी, 'खरें खरें व शुद्ध विचाराचें अुत्तर' म्हणून याचा अंतर्भाव काव्यांत करतां यावयाचा नाही असेंच ते सांगतात. पण हीं दोन काव्यें, काव्येंच काय पण वाङ्मयहि नव्हेत; प्रस्तुत विचार वाङ्मयविषयक असल्याने आपलें लक्षण बरोबरच आहे अशी सुटका ते करून घेतात (पृ.८५). पूर्वीचें यथार्थदीपिकेसारखें लेखन वाङ्मय आहे, पण त्यांत रसात्मकता शोधावीच लागते. तें ओवीबद्ध म्हणूनच त्यास काव्य म्हणावें लागतें. पण म्हणणें निराळें आणि असणें निराळें. कदाचित् ओवीची गेयता 'जवळ जवळ सपकच' असते, तेव्हा तिला गद्य समजून ओवीबद्ध तत्वज्ञान म्हणजे गद्यच, काव्य नव्हे, असें अुत्तर देअून आपल्या व्याख्येचें समर्थन त्यांना करितां येअील. पण वाङ्मय शब्दसुद्धा न घालतां 'काव्य म्हणजे गेय **वाक्यरचना**' (पृ. १६३) असें जेव्हा ते म्हणतात तेव्हा हीहि पळवाट ते ठेवूं अिच्छीत नाहीत असें वाटतें.

वास्तविक गद्य विरुद्ध काव्य असा विरोध नाही. गद्य विरुद्ध पद्य, किंवा काव्य विरुद्ध अकाव्य असा तो आहे. काव्य– म्हणजे कविता– म्हणजे पद्य हें समीकरण (पृ.१५३) शास्त्रीय विचारांत तरी प्रा. माटे यांनी मान्य करावयास नको होतें. त्यांनीच पृ. ७६ वर त्यांचे निरनिराळे अर्थ स्पष्ट केले आहेत. काव्य म्हणजे 'कविकृतींत असणारा प्रतिभेचा आणि **रसाचा गुण**' हा अर्थ त्यांना माहींत आहे, व 'पद्य म्हणजे विशेष प्रकारची गेय पदपंक्ति' हेंहि त्यांनी सांगितलें आहे. मग कांही लोक आणि त्यांत न. चिं. केळकर हेहि शैथिल्याने व्यवहारांत पद्य शब्दाचा अुपयोग काव्य या अर्थी करीत असले तरी त्यास मान्यता देण्याचें कारण नव्हतें.

विवेचनाच्या भरांत परस्पर विरोधी लेखन झाल्याचें ग्रंथकर्त्यांच्या लक्षांत आलेलें दिसत नाही. '**आकारावरून** अेखाद्या गोष्टीला तें तें नांव देण्यांत आपण योग्य तेंच करतों (पृ.६९) किंवा '**रूप** ही खूण चुकीची नाही' (पृ. ९२) या वाक्यांच्या शेजारीं 'कारिकांनी जरी काव्याचें **रूप** घेतलें असलें तरी त्यांचा अंतर्भाव आपल्याला काव्यांत करितां येणार नाही. त्यांचें **रूप** कवितेचें आहे अेवढ्याच मुद्यावर त्यांना काव्य-वाङ्मयांत दाखल करून घेणें युक्त नव्हे' (पृ. ८५) हीं वाक्यें ठेवून पाहावींत. तसेंच 'कवितेची गेयता घालविल्यावर तिच्यांत काय अुरलें' (पृ. १८५) असें विचारणारांना 'चाल व गाण्याची गोडी वजा झाली म्हणजे अुरलें तें **कवीचें खरें बळ होय.** काव्याची **स्वयंभू सौंदर्यसिद्धि** असेल ती **कवीची हमखास मत्ता असते**' असें लिहितां येअील असें वाटत नाही. संदर्भरहित हीं वाक्यें संदर्भांत बसवूनहि त्यांमधील विसंगतींची जाणीव झाल्याखेरीज राहणार नाही.

या विसंगतीपेक्षा स्वतःच्या 'मननानें' त्यांनी अितर कांही विचार प्रकट केले आहेत त्यांत अधिक गंभीर असे दोष झाले आहेत. भाषा आणि सर्व धातु केवळ नादानुकरणाने निघाले, क्रियावाचक 'धातु' हेच सर्व शब्दांचें मूळ होत, मूळच्या भाषेंत अेक अेक दोन दोन असे सुटे शब्द होते, अेका अेका वस्तूला आणि कल्पनेला केवळ अेका शब्दाने नांव देणें हा भाषेंतला मोठा पुरुषार्थ होय; असे सुटे पुष्कळसे शब्द आधी तयार झाल्यावर नंतर वाक्यें बनविलीं गेलीं अित्यादि विवेचन कल्पनारम्य व मनोरंजक असलें तरी आजच्या भाषाशास्त्रीय

विचाराला कितपत मान्य होईल याविषयी फार शंका वाटते. मुद्रणकलेच्या आधी गद्याला तेज नव्हतें हें संस्कृत वाङ्मयापुरतें तरी सर्वस्वी खरें नव्हे. 'संस्कृत साहित्यशांपुढे गद्य नव्हतेंच. पद्यच होतें. त्याचींच अुदाहरणें त्यांनी दिलीं. गद्य अुदाहरणें सांपडावयाचींच नाहीत. गद्याचीं अुदाहरणें त्यांनीं काय म्हणून द्यावीं ? काव्य कसें असतें हें त्यांना ठाअूक होतें; व तें गद्यरूप नसतें हेंहि त्यांना ठाअूक झालेलें होतें' हें विवेचन तर धाष्टर्याचेंच ठरेल. काव्य हें गद्य, पद्य आणि मिश्र असें असतें असें भामह, दण्डी, दोन्ही वाग्भट, अग्निपुराणकार अित्यादींनी स्पष्ट म्हटलें आहे. त्यांनी अुदाहरणें पद्यांतून दिलीं असलीं तरी पद्योदाहरणें देणें सोअीचें असतें म्हणूनच. गद्य अुदाहरणें सांपडावयाचींच नाहीत (पृ. ७८) असें जें लेखकांनी म्हटलें आहे तेंहि खरें नव्हे. कादंबरी, मालतीमाधव, वेणीसंहार, मृच्छकटिक यांतून अुदाहरणें वेगवेगळ्या लेखकांनी दिलेलीं आहेत.

स्वतंत्र विचारप्रवृत्तीमुळे अैतिहासिक दृष्टीने भाषा आणि वाङ्मय यांबाबत वर दर्शविल्याप्रमाणे दोष घडले असले, तरी कांही बाबतींत प्रा. माटे यांचें विवेचन ठराविक कल्पनांना धक्का देणारें व म्हणून अभिनंदनीय वाटतें. वाल्मीकीच्या तोंडून जो अनुष्टुभ् छंद निघाला तो केवळ 'आकस्मिक प्रत्यवभास' होता ही गोष्ट त्यांना अमान्य आहे. 'अनुष्टुभाचें स्फुरण व्हावयास मूळ अनुष्टुभ् हा पद्यविशेष त्याला माहीत असणें अत्यंत अवश्य होतें. तो त्याला चांगलाच परिचित असला पाहिजे' असें ते स्पष्ट लिहितात. त्या छंदामध्ये त्याच्या शोकास श्लोकत्व मिळालें हें स्फुरणाने झालें असेल, पण छंदहि नवीनच स्फुरला हें यथातथ्य नव्हे. तसेंच या विशिष्ट घटनेमुळे काव्यास प्रारंभ झाल्याने त्यांत विशेष कांही दैवी व पवित्र आहे असेंहि त्यांना वाटत नाही. तसेंच प्रतिमा अुत्कट झाली की पद्यामध्येच आविर्भूत होते हेंहि खरें नव्हे; गद्यांतहि होते. कवींच्या द्रष्टेपणाविषयींहि त्यांचीं मतें स्पष्ट व अनुभवास धरून आहेत. कवि द्रष्टे नसतात; कवित्व निराळें, द्रष्टेपणाच्या गोष्टी सर्वथा निराळ्या. कवि हा तत्त्वज्ञानी असतो हा समज चमत्कारिक असून त्याचा निचरा व्हावयास हवा अित्यादि विधानें तिखट असलीं तरी त्यांतील अर्थाबद्दल फारशी तक्रार करतां येणार नाही. काव्यरचनेमध्ये जाचक होणाऱ्या गोष्टींचें त्याचें विवेचन यथार्थ व अनुभवसिद्ध वाटतें. ओवी, अभंग व मुक्तच्छंद यांमधील गेयतेविषयींचें त्यांचें म्हणणेंहि लक्षांत घ्यावयास हवें. काव्य हा वेगळा वाङ्मयरचनाप्रकार नव्हे हें त्यांचें मत मात्र चिंत्य आहे. केळकरांनी गद्यपद्यविवेकविषयक लिहिलेल्या अेका अभंगाची छाननी अगदी समतोल नसली, तरी मोठी सडेतोड आहे. प्रा. माटे यांच्या भाषेंत असणारी प्रौढि, डौल आणि त्याबरोबरच सुबोधता हे गुण या लेखनांत प्रकर्षाने दिसतात. अनेक ठिकाणीं गद्यांत काव्य अुतरलें, आहे हें त्यांच्या अुपपादनास अनुकूल वा प्रतिकूल कसेंहि असलें तरी, आणि त्यांना स्वतःला कदाचित् मान्य नसलें तरी, सांगावयाला हवें. याच्या जोडीला मुद्रणांत लेखनदृष्ट्या साक्षेप दिसला असता तर फार चांगलें झालें असतें असेंहि म्हटल्यावाचून राहवत नाही.

रा. श्री. जोग

'तुषार' या काव्यमय, परंतु संदिग्धार्थ, नांवाने प्रा. पंगु यांनी आपल्या टीकालेखांचा अेक संग्रह नुकताच प्रसिद्ध केला आहे. 'आस्वाद' या त्याच स्वरूपाच्या संग्रहाचें हें धाकटें भावंड होय. अेकंदर आठ लेख यांत आले आहेत. त्यांत पांच लेख महाविद्यालयांतून नेमल्या गेलेल्या पाठ्य पुस्तकांवर आहेत. अेक नायक-नायिकाविषयक तात्त्विक चर्चेच्या स्वरूपाचा

आहे. अेक रसविमर्श या ग्रंथाचें परीक्षण असून शेवटला लेख म्हणजे 'डाकबंगला' या सुप्रसिद्ध कादंबरीचें रसग्रहण आहे. स्थूल मानाने प्रत्येक लेखाच्या वाटणीस २० पानें आल्याने त्यांमधील चर्चा विस्तृत व तपशीलवार झाली आहे. सामान्य अभ्यासु वाचकास, विशेषतः विद्यालयीन विद्यार्थ्यांस, पाठ्य पुस्तकांवर सविस्तर चर्चा वाचावयास हवी असते. आजकाल अशी चर्चा कोणत्याहि नियतकालिकांतून येअू शकत नाही. तेव्हा या प्रकारच्या टीकालेखसंग्रहांची अत्यंत आवश्यकता आहे यांत शंका नाही. प्रा. पंगु आणि त्यांचे प्रकाशक हे याबद्दल विशेष अभिनंदनास पात्र आहेत.

आपल्या टीकालेखसंग्रहाविषयी प्रा. पंगु यांनीच प्रतिज्ञा केली ती अशी : हा लेख "वाङ्मयीन (टीकालेख अितर कोणत्या दृष्टीने लिहितात ?) आणि कलात्मक दृष्टीने लिहिले असून त्यांतील विवेचन तौलनिक, उद्बोधक व विचारप्रवर्तक करण्याकडे लक्ष पुरविलें आहे. वाङ्मयीन मूल्यमापन करतांना मीं ग्रंथकारासंबंधी न्यायबुद्धि दाखविली आहे. दुसऱ्या टीकाकारांकडून ग्रंथकारांस झालेला अन्यायहि दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. माझी टीका केवळ पुस्तकांवरीलच नसून, पुस्तकांच्या पुस्तकांवरील असल्यामुळे कांही ठिकाणीं ती जशी नवीन मुद्दे सुचवील, तशीच बराच काल माजलेल्या प्रमादयुक्त व अवास्तव मतांचेंहि तीं खंडन करील."

या प्रतिज्ञेबरोबर अितर टीकालेखक आणि त्या टीकेचे वाचक यांच्यासंबंधी कांही कडक विधानें त्यांनी केलीं आहेत. 'आजची टीका होयबा वृत्तीची, नाहीतर अहिनकुल-वृत्तीची असते', 'पूर्वीच्या वाचकवर्गाहून आजच्या वाचकवर्गाची बौद्धिक पातळी खाली गेली आहे', 'सहानुभूतीने वाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टीच आमच्या टीकाकारांना नाही', 'आमच्या तरुणांच्या चिकित्सक, चौकस व स्वतंत्र बुद्धीची अधोगति झाली आहे' इ० इ०. टीकाकारांना आणि वाचकांना, दोघांनाहि धडा घालून द्यावयास निघालेल्या लेखकाने आपली जबाबदारी वाढविली आहे यांत शंका नाही.

ही जबाबदारी निर्भीडपणें असली, तरी निःपक्षपातीपणाने सर्वत्र लेखकाने पार पाडली आहे असें वाटत नाही. 'नाट्यछटा' आणि 'इंदु काळे आणि सरला भोळे' या दोन टीकालेखांत आलेलें विवेचन सांगोपांग, विस्तृत व सामान्यपणें तटस्थवृत्तीने झालेलें आहे. तसेंच तें अितर लेखांत होतें तर फारच अभिनंदनार्ह झालें असतें. पण अितर लेखांतून कोणाच्या तरी बाजूने किंवा विरुद्ध वकीलपत्र घेअून लेखक मांडत आहे असा भास फार होतो. 'अनिरुद्ध प्रवाहा'मधील अेकहि कथा त्यांना परिणामकारक वाटत नाही. संबंध 'रसविमर्शा'त प्रशंसनीय असा कांही भाग त्यांना दिसला नाही. प्रेमसंन्यासावरील खांडेकरांच्या आक्षेपांमधील अेकहि आक्षेप त्यांना टिकाअू वाटला नाही. 'डाकबंगल्या'वरील अेकूणअेक आक्षेप त्यांना फोल वाटतात. आपाततः ('तुषार'कर्त्यांच्या अर्थाने नव्हे) तरी हें चमत्कारिक वाटतें. खांडेकरां-विरुद्ध गडकऱ्यांचें वकीलपत्रच त्यांनी घेतलें आहे. खांडेकरांच्या मतें 'कमलाकराचें स्वभाव-चित्र म्हणजे काजळी ढगांनी व्यापलेलें अवसेचें आकाश' आहे. पंगूंना हें मान्य नाही. पण कमलाकराच्या अेखाद्या गुणाचा अुल्लेख त्यांनी केला आहे असें नाही. गडकऱ्यांनी कमलाकराचें पात्र भडक रंगविलें आहे असें खांडेकरांचें मत; पंगूंना तेंहि मान्य नाही. कारण काय तर स्वतःच्या जीवावर बेतणाऱ्या चुका त्याच्याकडून होतात; त्याच्या हातून कांही चांगल्या कृति होतात म्हणून नव्हे. खांडेकर 'कमलाकर प्रत्येक स्त्रीच्या मागे लागून राक्षस बनला होता' असें विधान करतात त्याला कमलाकराच्या वकीलांनी दिलेलें अुत्तर तर पाहण्यासारखें आहे. 'प्रत्येक

स्त्रीच्या पाठीमागे लागणारा कामांध पुरुष कमलाकर नव्हे. लीलेचा हात त्याने पापी बुद्धीने धरिला हें खरें, पण अर्थात् तिने त्याला प्रथम झिडकारलें होतें यास्तव सूड घेण्याकरिता. मनोरमेवर आगगाडीच्या डब्यांत अत्याचार करण्याचा प्रयत्न कमलाकर करतो हेंहि खरें, पण जयंतावर सूड अुगवण्याकरिता त्याच्या बायकोचे धिंडवडे काढण्याकरिताच होय. आपल्या कामाग्नींत त्याने दुमनचा होम केला हेंहि खरें, पण तें करितांना त्याचें खरें लक्ष तिच्या दागिन्यावर आहे, ( तो केवळ काम नव्हे ). सुशीलेच्या पातिव्रत्यावर घाला आणण्यास त्याने जी मदत केली तीमध्ये त्याला दहा हजार रुपये मिळावयाचे होते, ती स्वतःकरिता नको होती. शेवटीं, नाटकांतील अुरलेलें स्त्रीपात्र वीणा. तिच्याकडे त्याने ढुंकूनहि पाहिलें नव्हतें (नशीब तिचें !). प्रत्येक स्त्रीमागे कमलाकर कोठे आहे ?' यावर टीका करण्याचें कारण नाही. खांडेकरांचा आक्षेप सुना जाअू द्यावयाचा नाही म्हणूनच की काय जयंतासंबंधीच्या आक्षेपास पंगूंनी दिलेलें अुत्तर पाहावें. खांडेकर जयंताला व्यवहारशून्य म्हणतात, तर 'तुषार'कर्ते त्याला 'व्यवहारशून्य म्हणण्यापेक्षा भावनाप्रधान म्हणणेंच जास्त शोभेल' असें सांगून, 'अशीं माणसें आपल्यावरच येणाऱ्या भावी संकटांकडे जागरूकतेने पाहत नाहीत, व मग हटकून कोणत्या तरी कचाटांत सांपडतात' असा आपल्या म्हणण्याचा खुलासा करतात. व्यवहारशून्यता यापेक्षा कांही निराळी असते काय ? अेका टिकाणीं खांडेकरांचा आक्षेप मान्य करणें भागच पडलें, पण तेंहि पंगूंनी सरळपणें केलें नाही. त्याबद्दल ते लिहितात :— हा आक्षेप जुना आहे, (पण अर्थात् ) यथायोग्य आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाही ( कोण हा प्रसंग ! ). पण पुढें आरोपीच्या पहिल्या गुन्ह्याच्या मुद्यावर गडकऱ्यांचे वकील लिहितात :— प्रथमकृति म्हणून येथे त्यांच्या (गडकऱ्यांच्या) दोषांकडे सहानुभूतीनेच पाहिलें पाहिजे.

वकिलाची भूमिका स्वीकारल्याने वकिली भाषाहि पंगूंनी स्वीकारलेली दिसते. प्रतिपक्षाचा अुपहास, बारीक चिमटे, चावे यांनी आपली भाषा पंगूंनी नटविली आहे. 'निष्कारण वाद घालणारे खांडेकर', प्रो. वाटवे यांची 'वाचाळता' आणि 'ढोंगीपणा', पेंडशेकरांचा 'बुद्धिस्वातंत्र्याचा अभाव' अित्यादि भाषा वकिलींत शिष्टसंमत असली तरी निःपक्षपाती टीकेमध्ये शोभून दिसेल असें नाही. बचाव आणि हल्ला या दोन्ही दृष्टींनी प्रा. पंगु भाषेचा अुपयोग कुशलतेने व जोरदारपणें करूं शकतात व अुपरिनिर्दिष्ट लेख याकरिता खास वाचनीय झाले आहेत. पण यामुळे स्वतःच्या मतांत असणारी विसंगति त्यांच्या ध्यानांत येत नाही. 'डाकबंगल्या'चा बचाव करीत असतांना अितरांना संस्कृति-संरक्षक मंडळाचे सभासद बनविणारे प्रा. पंगु नायकनायिकावादांत 'विवाहप्रधान मराठी नाटकांत पुरुषाकडे दरपक्ष असल्यावर नायिका कितीहि स्वतंत्र वृत्तीची असली तरी नायकाच्या अपेक्षेने तिचें नाटकांतील स्थान दुय्यमच समजलें पाहिजे' असा युक्तिवाद करतात. नाट्यछटांच्या चर्चेच्या अखेरीस कलात्मक वाङ्मयाने समाजशुद्धि आणि मतपरिवर्तन होअूं शकतें असें दाखवून निर्भेळ कलावादी सद्गृहस्थांस ते टोला देतात, तर 'डाकबंगल्या'च्या चर्चेच्या शेवटीं 'कलेच्या मागे ध्येयाचा ससेमिरा लावल्यास वाङ्मयानंदांत व्यत्यय आल्याखेरीज राहणार नाही' असेंहि ते म्हणतात. याअुलट 'अनिरुद्ध प्रवाहा'वरील टीकेच्या अखेरीस लेखिकेने मतप्रतिपादनाचें काम हात राखून केलें आहे, व वादग्रस्त प्रश्न अनिर्णित ठेवले आहेत अशीहि ते तक्रार करतात.

निष्कारण वाद घालण्याचा आरोप खांडेकरांवर करून आपण स्वतः मात्र तेंच करीत आहोंत हें प्रा. पंगूंच्या लक्षांत आलें नाहीसें दिसतें. नायक-नायिका वादांत प्रा. माटे यांनी

पराक्रम आणि आकांक्षांची कसोटी नायकास लावावी असें सुचविलें. प्रा. पंगु यांनी हें अमान्य करून 'वाचकांच्या सहानुभूती' ची कसोटी सुचविली. वस्तुतः पराक्रमशून्य व आकांक्षाहीन व्यक्तीविषयी सहानुभूति वाटणेंच कठीण. तेव्हा मतभेद नसतांना मांडण्याचा हा प्रकार झाला असें वाटतें. मराठी आणि संस्कृत वाङ्मयांत नायकाकडून पराक्रमाची किंवा आकांक्षांची अपेक्षाच नव्हती असेंहि त्यांनी दडपून दिलें आहे. दशरूपकांत नायकांत अितर गुणांबरोबर 'शूरो दृढश्च तेजस्वी' या शब्दांनी व्यक्त होणारे गुण असावेत असें म्हटलें आहे. साहित्यदर्पणांत तो 'कृती' व दक्ष म्हणजे 'क्षिप्रकारी' असावा असें म्हटलें आहे. याचा अर्थ प्रा. पंगु यांस अनुकूल निघणार नाही. मराठी नाटकें अगदी प्रणयप्रधान झाली तरी निष्क्रिय नायकावर मराठी वाचकांचें समाधान होअील असें नाही. भक्तीच्या अुत्कट आस्वाद्यतेसंबंधी प्रा. पंगू यांनी घातलेला वाद हाहि निष्कारणच म्हणावा लागेल. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, मिराबाअी, चैतन्य, रामकृष्ण परमहंस यांना आलेल्या अुत्कट अनुभवाची साक्ष त्यांच्या वाङ्मयांतून दिसत असतां आपल्यास अनुभव येत नाही अेवढ्याच मुद्यावर ती अुत्कट होत नाही असें म्हणण्यांत काय अर्थ? ती भावना पूर्वीहि साऱ्यांना अनुभवाला येत नसेल, आज अनेकांना तिचा आस्वाद मिळत नसेल, भक्ति म्हणजे भ्रम असेल, म्हणून तिला रसपदवी वाटल्यास देअूं नये. पण हा भ्रम अुत्कट होतो, होअी, पुढेहि कदाचित् होत राहील. तिला निर्जीव दगड पाहिजेच असें नाही, पण त्या दगडाबद्दलहि अुत्कट प्रेम लोकांना वाटतें हें प्रत्यक्ष सिद्ध असल्यावर सजीव माणसाला निर्जीव, म्हणून विजातीय, अशा दगडाबद्दल अुत्कट भावना कशी वाटेल या आपल्या मताच्या पिंडीला घट्ट विळखा घालून बसण्यांत काय लाभ?

शेवटीं, हे 'तुषार' विद्यार्थ्यांकडून अभ्यसनीय आहेत यांत शंका नाही हें सांगणें आवश्यक आहे. स्वतः लेखकाने त्यांना मार्मिक टीकालेख म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. त्यांना कोणी शालेय म्हटलें तरी त्याची क्षति लेखकाने बाळगूं नये. अेक आवश्यक कार्य त्यामुळे साधतें आहे. स्वतः लेखकाच्याच अिच्छेप्रमाणे वाचकांनी मात्र ते शुक-पाठाप्रमाणे वाचूं नयेत. मार्मिक विवेचन व चुरचुरीत भाषा यांमुळे हे लेख आकर्षकहि झाले आहेत. तुषारांप्रमाणे ते सौम्य सुखाह्लाद देणारे मात्र नाहीत. त्यांना 'फवारा' हेंच नांव अधिक शोभलें असतें. त्याने टीकाविषयीभूत प्रतिपक्षी जखमी होत नसला, तरी तात्पुरता भिजून चिंब होतो.

रा. श्री. जोग

'परामर्श':– अभिप्रायांवर अभिप्राय देणें ही गोष्ट चमत्कारिक खरीच; पण माडखोलकरांच्या 'परामर्शा'विषयी लिहावयाचें म्हणजे हाच प्रकार होणार आहे. 'परामर्शा'त परीक्षणांपेक्षा अभिप्रायच अधिक आहेत. साप्ताहिकामध्ये अभिप्राय देण्यापेक्षा अधिक कांही करितां येणें शक्यच नसतें. अेकंदर २७ लेखांपैकी २–४ च परीक्षण या नांवास पात्र ठरतील. अितर लेख बहुतांशीं अभिप्रायांच्या स्वरूपाचेच आहेत. आपले अभिप्राय कोणत्या धोरणाने लिहिले गेले आहेत हें माडखोलकर यांनीच सांगितलें आहे. वृत्तपत्रांतील परीक्षणें होतां होअीतों कडक असूं नयेत. त्यांत दोषांचें दिग्दर्शन आणि गुणांची बूज सहृदयतेने केलेली असावी; व त्याबरोबरच ग्रंथाच्या वाचनाने आपल्याला सुचलेले विचार व त्यांतील प्रतिपाद्य विषयाची आपल्याला असलेली स्वतंत्र माहिती त्या परीक्षणांत घालून ग्रंथकार आणि वाचकवर्ग या दोहोंच्याहि ज्ञानांत शक्य तर भर घालावी' हें तत्त्व तात्यासाहेब केळकर यांनी केसरींत असतांना माड-

खोलकर यांस सांगितलें व तोच आदर्श प्रस्तुत लेखांत माडखोलकर यांनीं डोळ्यांपुढे ठेविला आहे.

बहुतेक साऱ्या अभिप्रायांत परीक्ष्य ग्रंथाच्या बारीकसारीक गुणदोषांच्या विवेचनांत माडखोलकर शिरलेले नाहीत. परंतु ग्रंथाचा प्रमुख विशेष, मग तो गुणस्वरूप असो की दोष-स्वरूप असो, नेमका हेरून त्याबद्दल ग्रंथकारास योग्य तें शेलापागोटें द्यावयास ते चुकत नाहीत. गुणांची योग्य संभावना करून दोषांचेंहि ग्रंथकाराच्या दृष्टीने कारण लक्षांत घेऊन सहानुभूतिपूर्वकच त्यांचा ते विचार करितात. हें करीत असतां मापा बहुधा कडक न योज-ण्याची काळजी त्यांनी घेतली आहे. परंतु जेथे मिशनऱ्यांसारख्या किंवा युरोपीय अितर लोकां-सारख्या लेखकांच्या अेतद्देशीयांबद्दलच्या सहानुभूतिशून्य लेखनाचा परामर्श घ्यावयाचा होता तेथे जरूर तो कडकपणाहि त्यांनी स्वीकारला आहे.

परंतु अेवढें सांगितल्याने 'परामर्शा'ची खरी ओळख झाली असें नाही. 'परामर्शा'-मधील अभिप्राय म्हणजे अेका रसिक, विदग्ध अशा व्यक्तीच्या मनावर ग्रंथवाचनाने झालेल्या परिणामांचीं त्रोटक पण हृद्य चित्रें होत. रसिक व संवेदनशील माणसावर परिणाम करणारा ग्रंथ कसाहि असला तरी त्या ग्रंथाबाबत त्याच्या मनाच्या प्रतिक्रिया विचार व भावना या दृष्टींनी विशेष अभ्यसनीय असतात. कित्येक वेळा मूळ ग्रंथ बाजूलाच राहून अभिप्रायलेखक आपलेच विचार सांगत असतो. केव्हा ग्रंथावरून सुचलेले साहित्यविषयक तात्त्विक विचारच तो वाचकां-पुढे मांडतो. केव्हा अितर वाङ्मयांत आढळलेल्या सदृश अशा लेखनाशीं प्रस्तुताची तुलना करून त्या वाङ्मयाची स्मृति आणि प्रस्तुतावर प्रकाश या दोनहि गोष्टी साधतो. 'परामर्शा'त आलेल्या ग्रंथांवरील अभिप्रायांच्या पाठीमागे असणारें लेखकाचें विविध विषयांचें वाचन, सहृदय मन, जीवनाच्या अनेक अंगांचें मार्मिक व सकौतुक अवलोकन हाच भाग वाचकाने लक्षांत घेण्या-जोगा आहे. याच गोष्टींनी या लेखनास अुच्च वाङ्मयाचें स्वरूप आलें आहे. परीक्षणीय ग्रंथांची सांगोपांग चर्चा म्हणून या लेखनाकडे पाहणाऱ्याची कदाचित् निराशा झाली तरी अुपरिनिर्दिष्ट कारणांमुळे प्रस्तुत टीकालेखसंग्रह वाचनीय झाला आहे. मर्मविवेचन, स्वतंत्र प्रतिपादन आणि पुनर्निर्मिति या तिन्ही प्रकारच्या टीकेचे नमुने अंशतः का होअीना या साऱ्या लेखांतून वाचकांस दिसून येतात. आधुनिक टीकाकारांत माडखोलकरांना जें बरेंच वरचें स्थान मिळालेलें आहे तें यामुळेच. स्थलमर्यादेचीं बंधनें पाळावीं न लागतां जर माड-खोलकरांना हें लेखन करतां आलें असतें तर त्यांच्या या लेखनाचें स्वरूप अधिक हृदयंगम झालें असतें असें म्हटल्यावाचून मात्र राहवत नाही.

रा. श्री. जोग

'सावरकर-काव्य-समालोचन'—गेल्या वर्षी बॅ. सावरकर यांची षष्ट्यब्दि सार्वजनिक रीतीने मोठ्या अुत्साहाने साजरी झाली. परंतु हे समारंभ त्या त्या वेळीं जरी गाजले तरी त्यांची स्मृति त्या सभारंभांत भाग घेणाऱ्यांपुरतीच मर्यादित राहिली. या प्रसंगाचें औचित्य लक्षांत घेअून त्यातल्या त्यांत चिरंतन स्वरूपाचें कार्य करण्याचे दोन प्रयत्न झाले. अेक श्री. शिवराम-पंत करंदीकर यांनी लिहिलेल्या सावरकरचरित्राचा पहिला खंड आणि दुसरा प्रयत्न म्हणजे प्रो. मायदेव यांचा. प्रो. मायदेव यांनी त्यांच्या स्फुट कविता अेकत्रित करून कालानुक्रमाचा पडताळा पाहून संपादित केल्या आणि त्याबरोबरच 'सावरकर-काव्य-समालोचन' हें पुस्तक अनेक लेखकांच्या साहाय्याने प्रसिद्ध केलें. सावरकर यांच्या काव्याचें परीक्षण विविध दृष्टींनी

करतां येणें शक्य आहे आणि राजकारणांत मतभेद असतांना देखील त्यांच्या काव्याचे केवळ साहित्यदृष्टीने भक्त असलेले अनेक लेखक दाखवितां येतील. या सर्वांच्या सहकार्याने तेरा टीकात्मक लेखांचा हा संग्रह प्रो. माधवेद यांनी महाराष्ट्रवाचकांसमोर मांडला आहे. यांतील पहिला लेख स्वतः प्रा. मायदेव यांनी लिहिला आहे आणि त्यांत सावरकरांच्या काव्य-निर्मितीचा अितिहास देण्यांत आला आहे. सावरकरांच्या चरित्राप्रमाणेच सावरकरांच्या कविता-कन्यांचा जन्म आणि चरित्र हीं अद्‌भुतरम्यतेनें भरलेलीं आहेत हें यां लेखांत दिलेल्या माहिती-वरून दिसून येअील. या संग्रहांतील बाकीचे लेख सावरकरांच्या काव्याचें निरनिराळ्या दृष्टि-कोणांतून परीक्षण करणारे आहेत. सावरकरांच्या खण्डकाव्यांत गोमंतक हें प्रमुख आहे आणि त्यावर केवळ अैतिहासिक संशोधक दृष्टीने लिहिलेला श्री. अ. का. प्रियोळकर यांचा लेख अत्यंत व्यासंगपूर्ण आहे. गोमंतक काव्यांत जीं पार्श्वभूमि कवीने रंगविलेलीं आहे ती अैतिहासिक संशोधनाच्या निकषाला कितपत अुतरते या प्रश्नाचा साधार विचार श्री. प्रियोळकर यांनी केला आहे. त्यामुळे त्यांना कांही कांही ठिकाणीं कवीबरोबर मतभेद व्यक्त करावा लागला आहे. हें काव्य लिहिण्यांत सावरकरांचीं दृष्टि कवीपेक्षां प्रचारकाचीच जास्त दिसते असा निष्कर्ष त्यांनी काढिला आहे. तथापि गोमंतक काव्यांतील मध्यवर्ती कल्पनेबरोबर ते सहमत असावेत असें त्यांच्या खालील उद्गारांवरून दिसतें. "स्वधर्माकरिता गोमंतकांतील लोकांनी जो त्याग केला आहे त्याची सर कुणालाहि यावयाची नाही. आपले स्वतःचे देह बळी देअून त्यांनी आपल्या आराध्यदेवतांच्या मूर्ति संरक्षिल्या. धर्माकरिता आपल्या घरादाराचा व कुबेरासारख्या गडगंज संपत्तीचा त्याग केला......पुरुषांची काय पण स्त्रियांचीहि स्वधर्मनिष्ठा पाहून अचंबा वाटतो" (पृ ८३). ललितकृतींमध्ये अैतिहासिक सत्याचें परिपालन कोणत्या कक्षेपर्यंत करावें यासंबंधी अेकमत होणें दुरापास्त आहे. मध्यवर्ती कल्पना आणि तिला आवश्यक असलेली प्रमुख पार्श्वभूमि यांमध्ये सत्याचा अपलाप न होतां ललितकृतीमध्ये चित्रण व्हावें अशी या बाबतींत सामान्य अपेक्षा असते. कांही ठिकाणीं गोमंतक काव्यामध्ये ही सीमारेषा अुल्लंघलेली दिसते तर कांही ठिकाणीं केवळ कल्पनेने कवीने वर्णन केलेल्या प्रसंगास श्री. प्रियोळकर यांच्या संशोधनाने पाठिंबा मिळतो. गोमंतककाव्यलेखनाच्या वेळीं कवीला या विषयावरील ग्रंथांचें वाचनमनन करण्याअितकी अनुकूल परिस्थिति असती तर गोमंतक काव्याचें स्वरूप आजच्या-हून जरा निराळें दृष्टीस पडलें असतें.

गोमंतक काव्याचें कलादृष्टीने परीक्षण करणारा लेख प्रा. रा. श्री. जोग यांनी लिहिला आहे. गोमन्तक काव्याचें स्वरूप त्यांनी सहृदयतेनें आणि निःपक्षपातीपणाने या लेखांत दाख-विलें आहे. प्रा. जोग यांची दृष्टि प्रामुख्याने ललितवाङ्मयाच्या टीकाकाराची आहे. प्रस्तुत काव्यांत घटना किंवा प्रसंग यांनाच प्राधान्य आहे; व्यक्तिरेखांना कमी. सावरकरांच्या साऱ्याच वाङ्मयाप्रमाणे या काव्याचा मूळ हेतु तत्त्वप्रतिपादन हाच आहे. त्यांची महाकाव्याची कल्पना, त्यांचीं लेखनशैली आणि वृत्तयोजना यांसंबंधी प्रा. जोग यांनी केलेलें विवेचन सावरकर-भक्तांनाहि मान्य होण्याजोगें आहे. प्रस्तुत काव्यांत लालित्य कमी असल्यामुळे सामान्य वाच-काला त्याचा आस्वाद घेणें दुर्घट होतें, पण विद्वान् रसिकांच्या मनावर परिणाम करण्याचें सामर्थ्य या काव्यामध्ये आहे हा त्यांचा निष्कर्ष सर्वांना पटण्याजोगा आहे.

श्री. ना. ग. जोशी यांनी सावरकरांच्या काव्यांचा पद्यरचनादृष्ट्या विचार केला आहे. सावरकरांच्या काव्यलेखनाचे कालदृष्ट्या भाग पाडून त्या त्या कालांत त्यांनी ज्या वृत्तांचा किंवा जातींचा काव्यलेखनांत अवलंब केला त्यांचें स्वरूप श्री. जोशी यांनी चांगल्या प्रकारें

प्रस्तुत लेखांत दाखविलें आहे. 'चंद्रकांत' या जातीचा अुपयोग काव्यलेखनांत सावरकर यांनी सफाअीने आणि मनोवेधक पद्धतीने केला आहे. रचनेच्या दृष्टीने सावरकरांचें वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे त्यांनी अनुष्टुभ् छंदाचा मराठीमध्ये मोठ्या प्रमाणावर केलेला अुपयोग आणि गोमंतक काव्यांत वापरलेली वैनायक जाति. अनुष्टुभ् छंदांतील त्यांची रचना संस्कृतप्रचुर झालेली आहे तर वैनायक जातीमधील त्यांचा प्रयत्न अिंग्रजीच्या वळणावर गेला आहे. धावती प्रवाही चरण-रचना, दीर्घ अुपमा आणि लांब पल्लेदार पद्यपरिच्छेद हे विशेष या ठिकाणीं सांपडतात. परंतु काव्य वाचतांना ज्या सौकर्याची अपेक्षा वाचक करतात तें नसल्यामुळे गोमंतक काव्य जितकें लोकप्रिय व्हावयास पाहिजे तितकें तें झालें नाहीं असें म्हणावेसें वाटतें.

या संग्रहांतील अितर टीकालेख श्री. य. न. केळकर, प्रा. कानेटकर, श्री. अनंत काणेकर, प्रो. व. ना. नाईक अित्यादि अधिकारी वाङ्मयीन टीकाकारांनी लिहिलेले आहेत. सावरकरांच्या काव्यसंपदेंतील कांहीं रत्नांचें तेज त्यांनी पारखून पाहिलें आहे, तर कांहीं लेख-कांनी त्या काव्यसंपदेचें अेखाददुसरें वैशिष्ट्य घेअून त्याचें विवेचन केलें आहे. कांहीं लेख त्रोटक व अगदीच प्रासंगिक स्वरूपाचे वाटतात आणि त्यांची जागा अधिक व्यासंगी लेखांना मिळाली असती तर प्रस्तुत टीकात्मक ग्रंथाची अुपयुक्तता अभ्यासकाच्या दृष्टीने वाढली असती यांत शंका नाहीं. आपले नित्याचे अनेक अुद्योग सांभाळून प्रा. मायदेव यांनी सावरकरांची कविता संपादित केली आणि त्याबरोबरच 'सावरकर-काव्य-समालोचन' हा टीकात्मक लेखांचा संग्रह अनेक मित्रांच्या साहाय्याने प्रकाशित केला याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे.

श्री. रा. पारसनीस

## निबंध—

**साहित्यधारा**— ले० व प्रका० प्रा. श्रीपाद महादेव माटे, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य २॥ रु.

'साहित्यधारा' या पुस्तकांत प्रा. माटे यांनी निरनिराळ्या वेळीं लिहिलेल्या आपल्या तेरा लेखांचा संग्रह केला आहे. यांतील निम्मेअधिक लेख वाङ्मयीन विषयांवर आहेत तर कांहीं ललित निबंधाच्या आधुनिक कसोटीस अुतरणारे आहेत. पट्टीचे शैलीकार म्हणून आचार्य अत्रे यांनी प्रा. माटे यांना गौरविलें आहे; परंतु प्रा. माटे केवळ शैलीकार नाहीत. वैशिष्ट्यपूर्ण भाषाशैली हा त्यांच्या लेखनाचा गुण ठळकपणें डोळ्यांत भरण्यासारखा आहे यांत शंका नाहीं; पण भाषाशैलीच्या या वैशिष्ट्याच्या मागे त्यांचा असलेला दृष्टिकोण वाचकांच्या मनावर अधिक परिणाम करतो. अवलोकन, प्रचीति आणि मनन हा त्यांच्या लेखनाचा आत्मा आहे. यामुळे अुत्स्फूर्त झालेले विचार मांडतांना दुसरे लोक काय म्हणतात हें सांगण्यापेक्षा मला काय वाटतें हेंच ते हडसून खडसून सांगत असतात. त्यांच्या लेखांतील हृदयंगमतेला वैशिष्ट्यपूर्ण भाषा-शैलीप्रमाणेच सर्वत्र दिसून येणारा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा कारणीभूत झालेला आहे.

"शिक्षकाने केव्हा मरावें". हा त्यांचा लेख शिक्षकवर्गाबद्दल त्यांना वाटणाऱ्या सहानु-भूतीने ओथंबलेला तर आहेच, पण शिक्षकांच्या परिस्थितीवर विदारक प्रकाश पाडणाराहि आहे. महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्था स्वार्थत्यागाच्या पायावर अुभारण्याची प्रथा गेलीं सुमारें साठ वर्षें पडली आहे. त्या प्रथेची आवश्यकता आणि अुपयुक्तता या संस्थांनी शिक्षणक्षेत्रांत केलेल्या कार्याने सिद्ध झाली आहे. पण बदलत्या युगमानाप्रमाणे त्या प्रथेमध्ये कांहीं सुधारणा करणें

आवश्यक आहे की नाही हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. समाजांतील अितर धंदे स्वार्थत्यागाच्या भूमिकेवरून चाललेले नाहीत. अशा स्थितींत समाजाला अत्यंत आवश्यक असलेलें शिक्षणाचें कार्य करणाऱ्या शिक्षकांनी अर्धपोटीं राहून आपलें कार्य करीत राहावें असा आग्रह धरणें समंजसपणाचें होणार नाही. प्रा. माटे यांनी ही विचारसरणी या लेखांत परिणामकारक रीतीने पुढे मांडून वाचकांना शिक्षकांची फैफियत सादर केली आहे. मनांत आलें तर प्रा. माटे किती अुपरोधपूर्ण लिहूं शकतात याचा अेक अुत्तम मासला पृ. १९ वर वाचकांना पाहावयास सांपडतो.

"माझ्या राजेश्वरा!" हा या पुस्तकांतील अेक अुत्कृष्ट लेख म्हणून संबोधण्यास हरकत नाही. लेखाचा प्रारंभच कलापूर्ण आहे. ईश्वरविषयक आस्तिक्यबुद्धि आणि तदनुषंगाने परमार्थप्रवणता हा मानवी मनाचा अेक महत्त्वाचा घटक असल्यामुळें बहुजनसमाजावर परमार्थविमुखतेचा घेतलेला आळ कसा फोल आहे हा विचार त्यांनी या प्रकरणांत मांडला आहे. यांतील विचारांपेक्षा ते विचार व्यक्त करण्याच्या नावीन्यपूर्ण पद्धतीमुळे हा लेख सरस वठला आहे. याच विषयावरील त्यांचा दुसरा लेख म्हटला म्हणजे "पारमार्थिकांनी केलेला रामदासाचा पराभव" हा होय. रामदासी वाङ्मयांत पारमार्थिक विचार युगमानाचें प्रतीक म्हणून आलेले असले तरी त्यांचा मुख्य भर मानवी जीविताकडे डोळसपणें पाहून समाजाला प्रपंचप्रवण करण्याकडे होता आणि त्यांच्या शिकवणुकीची ही परंपरा पुढे चालविणारा शिष्यसंप्रदाय रामदासस्वामींना लाधला नाही; अुलट या विचारसंपदेकडे दुर्लक्ष करून त्यांच्या वाङ्मयांत कालमानाप्रमाणे समाविष्ट झालेल्या पारमार्थिक विचारांचीच री ओढण्यांत आली. त्यामुळे "दासबोध आणि तदितर ग्रंथ यांत रामदासाने सांगितलेल्या प्रपंच-विज्ञानाचें बीज परमार्थाने रूक्ष बनलेल्या महाराष्ट्रभूमींत दग्ध होअून गेलें" असा प्रा. माटे यांनी निष्कर्ष काढला आहे. रामदासी वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने प्रा. माटे यांनी मांडलेले विचार महत्त्वाचे आहेत आणि रामदासी वाङ्मयाचें परिशीलन करणाऱ्या विद्वान अभ्यासकांनी आपल्या व्यासंगाच्या निकषावर हा निर्णय पडताळून पाहिला पाहिजे. लेखक ज्या कालांत लिहीत असतो त्या कालांतील कल्पना प्राचीन वाङ्मयांत शोधण्याकडे त्याचा कल होतो अशा सर्वसामान्य सिद्धान्ताच्या आधारें या लेखाची बोळवण होअूं नये; कारण प्रा. माटे हे अशा लेखकांपैकी नाहीत.

"लहान लहान वशीकरणें", "माझी विद्वत्ता" व "गैरसमजाचा पाठलाग" हे तिन्ही निबंध अुत्कृष्ट ललितनिबंधाच्या कसोटीला पूर्णपणें अुतरणारे आहेत. आकर्षक प्रारंभ, वाचकाबरोबर हितगुज करणारी भाषाशैली, थोर व्यक्तींसंबंधी अेखादी आख्यायिका, अेखाद्दुसऱ्या विनोदी प्रसंगाचें वर्णन अित्यादि जे विशेष ललित निबंधांत आपण अपेक्षितों त्यांचें मधुर मीलन तर या ठिकाणीं आपल्याला सांपडतेंच, पण त्याशिवाय संसारांतील बारीकसारीक गोष्टींकडे पाहण्याचा प्रा. माटे यांचा निकोप दृष्टिकोणहि प्रत्ययास येतो. माटे यांचें मन समावेशक आहे. अनेक गोष्टींचा संग्रह सहज जातां जातां तें करतें आणि अशा लहानसहान गोष्टी मनांत रुजल्या म्हणजे त्यांची विचारपरंपरा चालू होते. या मंथनांतून निर्माण झालेलें विचारमौक्तिक ते घोळून घोळून सांगतील. त्यांना तो विचार प्रिय असतो आणि तो किती प्रकारें वाचकांना सांगावा असें त्यांना होअून जातें. त्यामुळे त्यांचे कांही ललित निबंध दीर्घ झालेले वाटतात, पण त्यांच्या मांडणीमध्ये असें कांही आकर्षण आहे की मूळ विचार कळला तरी शेवटपर्यंत लेख वाचकांना वाचावासा वाटावा.

वाङ्मयविषयक निबंधांमध्ये "नायक आणि नायिका कोणास म्हणावें" यांतील विवेचन सर्वांना पटण्यासारखें आहे. कथानकाचीं सूत्रें जो चाळवितो त्यालाच नायक ही संज्ञा दिली पाहिजे असें मत त्यांनी या ठिकाणीं व्यक्त केलें आहे. 'ते केवळ कलावन्त असतात' यांतील निष्कर्ष मात्र विवाद्य होऊं शकेल. ललितलेखकानें केवळ कलात्म दृष्टीनें व्यक्त केलेले विचार आणि तत्त्वें, व त्याचें वैयक्तिक जीवन यांचा संबंध जोडण्याचा आग्रह धरूं नये. व्यक्ति ही किंचित्काल राहणारी आहे. त्या मानानें त्याची कला अमर आहे. व्यक्ति विसरली गेली तरी कलाकृतीचा आस्वाद घेणारे रसिक आनंदानें डोलूं लागल्याचें आपणांला दिसतें. या प्रश्नाची दुसरी बाजू टॉल्स्टॉयच्या 'कला म्हणजे काय?' या प्रख्यात प्रबंधांत आपणांस पाहावयास मिळते. या मतमतांतरांतून वाचकांना आपलें मत बनविलें पाहिजे.

प्रा. माटे यांचें स्फुट लेखन बरेंच आहे. तें त्यांनी पुस्तकरूपानें असेंच संकलित करून प्रसिद्धिल्यास मराठी वाङ्मयांत अुत्कृष्ट भर पडेल. त्यांच्या कांहीं जुन्या लिखाणांत चिरस्थायी होण्यासारखे गुण आहेत; हे लेख तर त्यांनी प्रकाशित करावेच, पण तेवढ्यानें तरुण वाचकवर्गाचें समाधान होणार नाही. नवीन नवीन वाङ्मयप्रकार त्यांनी हाताळावे, व्यासंग आणि अवलोकन यांनी परिपक्व झालेल्या विचारांचा बांध फसलेल्या लेखणीच्या द्वारा फोडावा. यच्चावत् ज्ञानाची अुपासना करावयाला पुढे येणाऱ्या तरुणवर्गाला स्फूर्ति देअील आणि मार्गदर्शक होअील अशा तऱ्हेचें अधिकाधिक लिखाण प्रा. माटे यांच्या हातून होअील अशी खात्री वाटते.

श्री. रा. पारसनीस

## काव्य—

**मानसमेघ**—श्री. गिरीश; प्रका० के. मि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य दीड रुपया.

**यशोगिरि**—श्री. यशवंत, प्रका० के. मि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य दीड रुपया.

**विसर्जन**—श्री. वि. म. कुलकर्णी; प्रका० मनोहर ग्रंथमाला, पुणें २; मूल्य १२ आणे.

**पुष्करिणी**—श्री. वसंत ढेवळे (कुसुमाकर); प्रका० सौ. शांताबाअी मोहिले, अमदाबाद ६; मूल्य दोन रुपये.

**हिमसेक**—श्री. पुरुषोत्तम शिवराम रेगे; प्रका० शबरी साहित्य प्रकाशन, मुंबअी ७; मूल्य रु. १॥.

सार्वत्रिक दुर्भिक्ष्याच्या काळांत वास्तविक काव्याची महर्घता वाढणें अधिक स्वाभाविक असतें. परंतु मराठी काव्याच्या प्रांतांत प्रसिद्ध होणारीं विविध प्रकाशनें पाहून सानंद आश्चर्य वाटतें. जुन्या नव्या पिढींतील अनेक कवींचे कवितासंग्रह अलीकडे प्रसिद्ध झालेले आहेत, त्यांमध्ये पहिल्यांदा श्री. गिरीशांचा "मानसमेघ" व श्री. यशवंत यांचा "यशोगिरि" हेच साहजिकपणें डोळ्यांत भरतात. रविकिरणमंडळाच्या या दोन सदस्यांनी आपली काव्यनिर्मिति अजून अखंड चालू ठेविली आहे हें पाहून कुणाहि रसिकाला आनंद व्हावा. परंतु प्रत्यक्ष वाचून पाहतां मराठी वाचकाला अधिकाधिक अभिमान वाटेल असे काव्यसंग्रह झालेले नाहीत असेंच निराशेनें म्हणावें लागतें. या वर्तमान प्रकाशनांत त्यांचा भूतकाळ दिसतो, पण भविष्य विशेष आशादायक भासत नाही.

'मानसमेघ' संग्रहांतील फारच थोडया कविता अव्वल दर्जाच्या सांपडतील, आणि विशेष नावीन्यानें नटलेल्या तर क्वचितच आढळतील. नाही म्हणावयास 'मानसमेघ' ही

दर्शनी कविता व पुढील चार-पांच प्रसंगनिष्ठ नाट्यकाव्यें वैशिष्ट्यपूर्ण वाटतात. पहिलींत आलंकारिक साजशृंगार दिसतो. परंतु अुपमा-अुत्प्रेक्षांची ही बऱ्यापैकी सजावट बालकवि-गोविंदाग्रजांच्या तरळ प्रतिभेची आठवण मात्र करून देते अितकेंच. पुढील नाट्यात्म कृति सोडल्यास नंतरच्या बऱ्याच कविता ठराविक 'गिरीशी' वळणाच्या आहेत. त्यांपैकी 'संजीवनी', 'स्नेहदीपिके', व 'सुरेल गुणगुण' यांसारखीं कांही काव्यें अुत्तम रचनाशैलीचीं अुदाहरणें म्हणून दाखवितां येतील. श्री. गिरीशांच्या रचनेंतील प्रसाद व सौष्ठव त्यांत दिसून येतें. 'स्मृतिनष्ट रामराज्य', 'अुद्यांचा हिंदवी वीर', 'धन्य राष्ट्र' यांमध्ये त्यांची राष्ट्रीय वृत्ति दिसते. कवीला शौर्याची आवड आहे व स्वातंत्र्याची तळमळ आहे पण त्याच्या भविष्यकालीन स्वराज्याचें निशाण 'जरीचें' व 'कापाय' वर्णाचें आहे. मध्ययुगीन नष्ट राज्यांना अजूनहि ते 'रामराज्य' म्हणूनच संबोधीत असून त्यांच्या आठवणीने हळहळत आहेत. यावरून वारा कुठल्या दिशेला वाहतो आहे तें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत येअीलच. क्रमांक ३१-३४ मधील संस्थाविषयक व ३५-४१ पर्यंतच्या व्यक्तिविषयक कवितांमधील मूळ भावना शुद्ध व अुत्कट असली तरी तिचें हें साहित्यमय पुनःसर्जन कांहीं मनाची पकड घेणारें नाही. केवळ वैयक्तिक अुद्गार अेवढेंच त्यांचें महत्त्व. अगदी फर्ग्युसन कॉलेज किंवा तांबे-माधव जूलियन यांच्याविषयींच्या कविताहि मामुलीच वाटतात.

क्र. ४२-४५ च्या कविता कथनपर आहेत. श्री. गिरीशांचें हेंच खरें विशेष स्थान. यांतील वर्णनौघ, व्यक्तिचित्रें व वातावरण चांगलें रेखाटलें गेलें आहे. अशा तऱ्हेच्या पण अखंड खंडकाव्यांचीच अपेक्षा श्री. गिरीशांकडून वाचक करीत आहे. फुटकळ भावगीतां-पेक्षा तींच त्यांनी अधिक लिहावींत असें त्यांच्या अेकंदर स्फुट कवितांचा विचार करतांना मनाला वाटूं लागतें. क्र. ४५ 'रखेली' मधील व्याजोक्ति बरीच परिणामकारक झाली आहे. (पण क्र. ३० 'संभावना' यामधील विडंबनात्मक व्याजोक्तीचा प्रयत्न, 'झेंडूच्यां फुलां'च्या तुलनेने पाहतां फसलेला आहेसें वाटतें !) क्र. ४६-५३ मधील अभंग सर्व संग्रहांतील प्रसन्न भाग आहे. पण येथेहि सरळ हृदयाचा ठाव घेणारा जिव्हाळा व अकृत्रिमता पाहिजे त्या प्रमाणांत नाहीत; बुद्धीच्या वावराला जरा जास्तच वाव दिलेला आहे; त्यामुळे वाचकाच्या मनाची पकड घेतली जात नाही. तरीहि 'वणवण', 'वेदना', 'घायाळ' हे अभंग चांगले आहेत असेंच म्हटलें पाहिजे.

या संग्रहांत चार नाट्यमय घटनांनी सजलेलीं भावगीतें आहेत. श्री. गिरीश हे या नाट्य छटात्मक साहित्यप्रकाराचे निबंधलेखक टीकाकार आहेत. त्यामुळे त्यांनी मूळ 'भूमिका' चांगल्यापैकी निवडलेल्या आहेत. पण त्यांची पद्यमय अभिव्यक्ति मनोवेधक झालेली नाही. 'चांदण्यांतील भेट' व 'आअीचा आशीर्वाद', या 'नाट्यमय अेकोक्ति' ( Dramatic Monologue) आहेत. यांतील दुसरी कविता सर्वसाधारण कौटुंबिक वातावरण अुत्पन्न कर-णारी आहे. परंतु त्यांतील 'आअी'चें व्यक्तित्व सुस्पष्टपणें रेखाटलें गेलेलें नाही. कालिदासाने नुसत्या स्पर्शच्छटेनेच शकुन्तलेच्या आअीचें—अदृश्य मेनकेचें—किती मोहक रेखाटन केलें आहे. त्याचाच विस्तार पुढे रसिकराज शिवरामपंत परांजप्यांनी केलेला आहे. तसली अुत्कटता या ठिकाणीं आली पाहिजे. कारण मूळ भूमिकेच्या दृष्टीने प्रसंगांतील नाट्य अशाच तऱ्हेचें आहे. पहिल्या कवितेतील भूमिका आणि त्यांचें काव्यमय चित्रण यांत मानसदर्शनदृष्ट्या विसंगति आहे. अेक 'भ्रांतचित्त' आअी आपल्या मृत मुलाला भेटावयाच्या अिच्छेने चांद-ण्यांत झाडाच्या सावलीखाली वाट पाहत आहे. अशा वेळीं नुसत्या नव्हे, पण 'भ्रमिष्ट'

आओीच्या मनाचें रेखाटन करणें अवश्य आहे. परंतु प्रत्यक्ष काव्यांत वर्णनावरच जास्त भर दिलेला आठवतो. आणि कृष्णा-कोयनांच्या प्रीतिसंगमाचें व आलिंगनाचें वर्णन तर त्या आओीच्या तोंडीं पूर्णपणें विसंवादीच दिसतें. त्यांतल्यां त्यांत 'मातृहृदय' व 'आओी! आओी!' हीं 'नाट्यात्म भावगीतें' बरीं आहेत. मातेची त्यागवृत्ति व पुत्राची निष्ठा हीं त्यांमध्ये बऱ्याच अंशानें यथातथ्य वठलीं आहेत. अेकंदरींत मात्र असें म्हणावें लागतें कीं भूमिकांतील नाट्याच्या मानानें प्रसंगचित्रें व व्यक्तिमानसाचें रेखाटन यांमधील नाट्य अुठून दिसत नाहीं. ही शक्ति खरोखर दुर्मिळ आहे. मनोगाहनात्मक व्यक्तिदर्शन ही अेखाद्या ब्राअुनिंगला साधणारी गोष्ट आहे. श्री. गिरीशांच्या आटोक्यांत ती अजून आलेली नाहीं. अर्थात् प्रयत्न या दृष्टीनें हा प्रकार स्वागतार्हच आहे.

'यशोगिरी'चीहि तीच गत आहे. श्री. यशवंतांचे जे कांहीं गुणविशेष लोकांना परिचित आहेत, ते यांतील कवितांतहि दिसत असले तरी अेकंदर वातावरण कायम ठशाचें आणि अेकसुरी आहे. 'मयूरास' पासून 'भास्करा'पर्यंतच्या कवितांत मोर, कुंपण, अरण्य, ढग, चन्द्रमा, भास्कर असे ठराविक विषय जुन्या साच्यांतून काढले गेले आहेत. त्यानंतरच्या कवितांत 'मुक्तिमार्ग', 'पहा ही जात पुजाऱ्यांची' व 'षष्ट्यब्दपूर्तिस्तव' या चांगल्या आहेत. 'शिवारातलं दैवत' व 'अन्नासाठी लायकी' यांत कथनपरता आहे. पण श्री. यशवंतांची या प्रकारच्या काव्यांत श्री. गिरीशांच्या प्रमाणे विशेष शक्ति दिसत नाहीं. तात्रे व माधव जूलियन यांच्यासंबंधीचीं काव्यें श्री. गिरीशांच्या तशाच काव्यांपेक्षा निराळ्या प्रकारचीं आहेत अेवढेंच. 'फूटवाटेपाशीं' ते 'तूंच राणी'पर्यंत अेकंदर पंधरा कविता प्रेमविषयक आहेत. त्यांत प्रसादपूर्ण रचना आहे. परंतु त्यांतहि जुने विषय, ठराविक प्रसंग, कायम ठशाची शैली यांमुळे विशेष नावीन्य किंवा प्रगति दिसत नाहीं. 'मागणी घालतांना', 'आवडत्या नांवांत', 'रागावुनि बैस सखे' यांवरून हेंच स्पष्ट होतें. 'दीपज्योतीस', 'सप्तपदी' व विशेषतः 'कान्ते, सन्तत राबसी' (सुनीत) अित्यादि काव्यंच काय तीं चांगल्यापैकी भावगीतें म्हणतां येतील.

हें असें कां व्हावें हा अेक मोठा प्रश्न आहे. अेकदा ख्याति झाली म्हणजे पुढील कृति कमी सरस निघाल्याच पाहिजेत असा जणू कांहीं अलिखित सिद्धान्तच बनला आहे. महाराष्ट्रसाहित्याच्या प्रांतांत कवींच्या जीवनांत पहिल्या बहरानंतर कांहींच बदल किंवा विकास होत नाहीं असें नाहीं, आणि बाह्य जीवनांतहि भयंकर अुलाढाली होतच असतात. साध्या कवीचा 'राजकवि'हि होतो आणि राष्ट्रीय – आंतरराष्ट्रीय जीवनांत प्रचंड वावटळीहि येअून गेलेल्या असतात. त्या दृष्टीनें या आमच्या श्रेष्ठ भावकवींच्यांत अवश्य विकास दिसावयास पाहिजे. 'मानवताकिल्ल्याची अैतिहासिक पर्वें', 'माण्डवीच्या पुनर्भेटींत' व सर्वांत जास्त 'ध्यास नि भास' या कवितांत असें कांहीं तरी स्थित्यंतर कविमानसांत घडलें असल्याचा 'भास' मात्र होतो, पण 'ध्यास' लागल्याचा पुरावा काव्यांत तरी विशेषसा आढळत नाहीं. 'यशोधनां'त जो क्षोभ, चीड, वैराग्य, उन्माद आढळांत आला, तो 'यशोगिरी'त नाहीं; मनाला थरारवून टाकणारा उत्कटपणा यांत प्रतीत होत नाहीं. अर्थात् त्यांनाहि जाणीव आहेच कीं 'अजुन यशोगिरि चढावयाचा पुढे अुच किति तरी', त्यासाठी त्याना 'पदर मैत्रिचा, हात कृपेचा अैशा समयीं हवा' आहे ('चढणीवर'); त्यांचे मित्र व रसिक वाचक त्यांस तो देतील आणि त्यांच्या 'देव्हाऱ्यां'तील ती अेकच 'मध्यवर्ती मूर्ति' आज ना अुद्यां प्रसन्न होअून या भक्तास 'धन्य धन्य' करील अशी आशा वाटण्यास जागा आहे. कारण आजचे 'राजकवि'

अुद्यांचे 'लोककवि' होण्यासाठी तळमळत आहेत. नोंदणी पद्धतीच्या नवयुगीन 'सप्तपदी'(?)च्या वेळींसुद्धा

स्फूर्तिगीत गाअूं गलितां
अुचलून घेअुंया दलितां
करुं पाठराखणी पतितां
चल माठ वाहुं ममतेचे– तीरस्तव मंवती कैक तृषार्त ।

असें ते नववधूला म्हणत आहेत. 'मांडवीच्या पुनर्भेटींत' त्यांना वाटतें आहे की माण्डवी ही जुन्या क्रान्तीची ध्वजा असून नव्या क्रान्तीसाठी तिने आपली 'भुजा' पसरली आहे. नवीन पिढीच्या 'सुस्वागता'स ती अुत्सुकपणें 'नटली' आहे. तिला कवि म्हणतात—

परतलों कां परी सांगुं का तव तटीं । राख माझी पडो तव जळीं शेवटीं
आणि मातें मिळो गर्भवासीं अुशी । क्रान्तिकारी नव्या ह्या पिढीची कुशी.

आणि 'ध्यास नि मास' या 'मग्नमूर्ति-' 'निर्वासित चिनी बालकास'सारख्या प्रखर, मुक्तच्छंदीय आवेशांत गाअिलेल्या कवितेवरून बरीच आशा वाटूं लागते. परंतु त्यांनी आता जुन्याच्या– 'अैतिहासिका'च्या–पर्वातून बाहेर पडण्याची आवश्यकता आहे. 'मानवता-किल्ल्या'ची भविष्यकालीन–'अैतिहासिक' नव्हे !– दिव्य पर्वे ते अुद्घोषूं लागतील तरच त्यांना क्रान्तीनंतरची सुंदर सृष्टि दिसूं शकेल. म्हणूनच (त्यांच्याच शब्दांत) श्री. यशवंतांना प्रेमाची विनंती करावीशी वाटते की,

'खुरटेपणा–तोकडेपणा । आता दिपवील मुळीं न ह्या जना
शोधायाची तरी अशी या की दृष्टि—
अनाकलनीय, अगाध, अविनय
आंढळेल जगीं भव्य स्वप्नमूर्ति' ('ध्यास नि मास')

श्री. गिरीश व श्री. यशवंत हे आमचे ज्येष्ठ कवि आहेत. ते जर मनांत आणतील तर मराठी काव्यांतील 'खुरटेपणा–तोकडेपणा' ते नक्की काढून टाकतील. 'अभागी कमल' व 'यशोधन' निर्माण करणाऱ्या बलवंतांना हें अशक्य कसें असूं शकेल ?

ना. ग. जोशी

'विसर्जन' हें अेक ५१२ ओळींचें विरहगीत आहे. 'आवाहन', 'पूजन', 'विसर्जन' व "समाप्ति' असे याचे चार भाग आहेत. छापील स्वरूपांत यमकबद्ध 'जीवनलहरी' जातीच्या अष्टपद्यांची पण खरोखर 'दाशी' जातीच्या रचनेची, 'जीवनलहरी'च्या अंतऱ्यांसह असलेली ही स्तबकमाळा डौलदार रचनेमुळे मोठी मोहक झालेली आहे. खरोखरं अलीकडच्या नवकवींनी रचनेवर मोठें वाखाणण्यासारखें प्रभुत्व मिळविलेलें आहे. 'माथ्यावर पदरं तुझा नादर तूं नार गडे' (पृ.१२), 'येशिल तूं आज घरीं जीवींच्या जगजेठी' अि. (पृ.१९), 'सृष्टिसखा ये वसंत' अि. (पृ. २८) आणि 'माझें मी बनुनि भूत' नंतरचा (पृ.३७) जवळ जवळ सर्व भाग मोठा गोंडस झालेला आहे. परंतु काव्यवाचनानंतर काव्यवस्तूपेक्षा 'रचनेचाच गोडवा जास्त वाटूं लागणें म्हणजे काव्याचें अेक मोठें व्यंग आहे, व त्याचें कारण म्हणजे विरहभावना जेवढी तीव्र त्याच्या मानाने रचनेचा पसारा जास्त झाला आहे हें होय. प्रस्तावनाकार प्रो. जोग यांनी प्रस्तुत काव्याचे गुणदोष मोठ्या हळुवार हाताने दाखविले आहेत. परंतु 'क्रान्तिगीतांच्या या काळांत विरहगीत प्रसिद्ध करणें हें धाष्टर्य आहे' असें जें ते म्हणतात त्याबाबत अेक गोष्ट स्पष्ट करावीशी

वाटते की सर्वच विरहगीतें नव्हे पण ज्यांत प्रेमभावनेचें अुन्नयन नाही, ज्यांत अुर्जस्वल भावविंग नाही, ज्यामध्ये विरहजन्य क्रियाशून्यताच मात्र प्रतिपादिली आहे, अशीं विरहगीतें वा कसलींहि गीतें प्रसिद्ध करणें हें 'धाष्ट्र्य' आहे. प्रस्तुत काव्याचेंच अुदाहरण घेअू. यांतील नायकाला, ज्यांनी खांद्यावर मायभूमीचें निशाण घेतल्यामुळे जीवन वेचिराख झालें आहे अशीं प्रेमिक युवयुवती 'धन्य गमति'. नंतर तोच म्हणतो आहे—

राष्ट्रास्तव, धर्मास्तव, ध्येयास्तव अुज्ज्वल वा
वेंचिलें न आयु कधीं, देअिल मज कोण दुवा ? (पृ. ३६)

तरीहि तोच नायक शेवटीं म्हणतो आहे— 'मी हताश–परि माझें प्रेम विश्व अन् जीवन' ! आणि म्हणून तो 'विरलेल्या प्रेमाची गीतावलि' गात आहे !! गतिमान जीवनाच्या दृष्टीने हें धाष्ट्र्यच नव्हे काय ? पौरुषहीन क्रियाशून्यतेची बढाअी गाणारीं गीतें हे अुत्तम काव्याचे नमुने कसे मानावयाचे ? तेव्हा असल्या स्मशानवैराग्याचेंच खरोखर 'विसर्जन' होणें जरूरीचें आहे. आणि त्यासाठी त्यागशील वीरवृत्तीचें गान गाअिलें गेलें पाहिजे. त्यांत प्रेम नसावेंच असें कुणीहि म्हणणार नाही, पण या प्रेमाने वीरवृत्तीची व धीरवृत्तीची पाठराखण करणें अवश्य आहे. मग तसलींच प्रेमगीतें सावरकरांच्या 'विरहोच्छ्वासा'प्रमाणे व कै. माधव ज्यूलियनांच्या 'विरहतरंगा'प्रमाणे रसिकमान्य होतीलच होतील. अर्थात् प्रस्तुत 'विसर्जन' कवितासुद्धा रसिकांना आवडेल अशीच आहे. पण प्रणयाच्या व प्रतिभेच्या नवशिकेपणामुळे आलेला शाब्दिक बहर अुत्कट भावनांचा परिपोष करण्याच्या आड येतो. म्हणून त्यांनी अधिक सुघन रचना करावी. असें केल्यानेच प्रणयाचें 'आवाहन', 'पूजन', 'विसर्जन' झाल्यावर करावयाचें 'आह्वान' प्रभावशाली होअील.

'पुष्करिणी' हा काव्यसंग्रहहि अशाच अेका नवकवीचा आहे. आणि यांतील रचनेचें सौष्ठवहि मोठें मनोहर आहे. कवीची वृत्ति सहानुभूतिपूर्ण आहे. त्याचें 'जन्मभूमी'वर प्रेम आहे, सर्व जगाच्या कल्याणासाठी 'नव्या युगांतील नवा धर्म' ते आणूं पाहत आहेत; मायलेकरांच्यामधील वत्सलतेने ते गहिंवरत आहेत; तारका, निर्झरिणी, चन्द्रकला, फुलपांखरें हीं निसर्गबालकें त्यांना प्रिय आहेत; पण शेवटीं 'भाव-अर्चना', 'प्रणयगीतें' गाअूनच केलेली आहे. प्रणयी नायक प्रेमाची 'निर्वाणीची याचना' करतो आहे, पण कशामुळेसें त्याचें हृदय 'घायाळ होअून' तो 'अुन्मनस्काचें गीत' गाअूं लागतो. पण त्यांचा प्रेमवेडो जीव सखी 'पूर्ण त्याची' होण्याच्या त्या 'अमरक्षणा'पर्यंत तग धरून राहायला तयार आहे. या प्रेमगीतांच्या रचनाशैलीवर गोविंदाग्रज व रविकिरणमंडळाचे सदस्य यांची छाया अस्पष्ट का होअीना दिसत आहे; हीं बहुतेक गीतें मोठ्या गोड शैलीत गुंफिलीं आहेत. बाकींच्यांपैकी 'आअीच्या हृदयांत' हें सुनीत अुत्तम आहे; 'फुलपांखरें' यांतील नाट्यकाव्य छान आहे. याच सहानुभूतीच्या शक्तीचा अुपयोग कवीने यापुढे आपला अभिवांछित नवा युगधर्म जगतीतलावर आणण्याकडे करावा; कारण 'पुष्करिणी' लिहून त्यांनी प्रणयाचें सार्थक केलें आहे. आता तदितर अत्यावश्यक गोष्टींकडे त्यांनी लक्ष पुरविणें अगत्याचें आहे; नव्हे, तो मुळी नवयुगधर्माचा संदेश आहे असें त्यांनीच म्हटलें आहे. यापुढील 'भाव-अर्चना' मानवतेच्या प्रेमवृत्तीची होवो अशीच अपेक्षा वाचक श्री. हेबळे यांच्यापासून करीत राहील. कालिदासाच्या शब्दांत म्हणावयाचें तर 'केवला लावण्यमयी छायां त्वां न मुञ्चति ।' परंतु लावण्य जरी सर्वप्रिय असलें तरी तें केवळ छायामय असून भागणार नाही, तें 'अग्निगर्भां शमीमिव'हि असलें पाहिजे. तेव्हा या 'लुसलुशीत'पणाच्या जोडीला 'रसरशीत'पणा येवो अेवढीच अिच्छा आहे. ना. ग. जोशी

"हिमसेक" या कवितासंग्रहांतील सर्व कविता मुक्तच्छंदात्मक आहेत. विषयाचें क्षेत्र नेहमींचें असलें तरी विषयाचा आविष्कार अभिनव पद्धतीचा हें या पुस्तकाचें वैशिष्ट्य आहे. मुक्तछंदानें मराठीच्या दरबारीं भीतभीतच प्रवेश केला. आपणाला या ठायीं जागा मिळेल वा नाही याची त्याला त्या वेळीं भीति वाटत होती. परंतु हळूहळू मुक्तच्छंदानें आपलें महत्त्व वाढवून अेक आसन आपलेंसें केलें असें दिसत आहे. 'भग्नमूर्ति' किंवा प्रस्तुतचा संग्रह हीं पुस्तकें वरील म्हणण्याची सत्यता दर्शवितील.

हिमसेक हा खराच हिमसेक आहे, हिमवर्षाव नाही, कारण अवघ्या १६ च कविता या संग्रहांत आहेत. कांही कविता त्रुटित म्हणजे फारच त्रुटित आहेत. पांचच चरणांत त्या आपलें स्वरूप प्रकट करतात. मराठींतील कणिका या रूढ काव्यरचनाप्रकारासारखा हा घाट दिसतो. बहुतेक ठिकाणीं विषय शृंगारपर असून मुग्ध, दुग्ध किंवा विदग्ध प्रीतीच्या शलाका त्यांतून पाहावयास मिळतात. भावगीताची गेयता, विस्तृतता किंवा कल्पनायुक्तता पाठीशीं नसतां या पंचचरणी कविता स-रस करणें अवघडच आहे ! श्री. रेगे यांचे भावगर्भ शब्द मात्र त्यांना खूप साहाय्य करतात यांत शंका नाही. मुजोर प्रीतीचा हिमार्त वारा जाळून गेला मनाचा मोहोर... या दोन ओळी कवीला जें म्हणावयाचें आहे तें ठासून म्हणतात असें दिसून येअील.

अुर्वशी, लीलारति व कलावती या तीन दीर्घ मुक्तच्छंदी कविता अुल्लेखनीय आहेत. पुरूरवा अुर्वशीला 'माघारि फीर' म्हणत असतां ती बाणेदारपणें "दुष्प्राप्य आता वायूपरी मी" असें म्हणते. ऋग्वेदांतील तेजस्वी अुर्वशी कवीनें तेजस्वी शैलीनेच प्रकट केली आहे. लीलारति ही कविता अिदकाच्या अुग्र मादक वासानें बहरली आहे. अेक विरही अधीर युवक तीन दिवसांच्या प्रियतमेच्या सहवासांतील स्मृति येथे अुजळवीत आहे; या वाचतांना वाचक प्रथम अुत्सुक असतो, पुढे तो दचकतो ! ! कवितेंतील नायक आपल्या प्रियेचें, अेखाद्या नागकन्येप्रमाणे, सर्वांगवर्णन या ठिकाणीं करीत आहे.

डोळे मासोळे, ओठ कोवळे गुलाब-कळे, नाक रेखीव, गाल मखमली-अित्यादि वर्णन बरें वाटतें. परंतु हा पर्युत्सुक प्रेमिक जेव्हा पुढीलप्रमाणे स्वच्छंद गातो तेव्हा मात्र बरें वाटत नाही ! तो म्हणतो—

तांबुस गहिरे अिवलेसे स्तन,
वरती दोन काबुली द्राक्षें, — काबुली मेवा चुंबचुंबावा !

पुढे कमरेवरच्या पांढुरक्या रेषांचेंहि वर्णन नायक करीत आहे. अत्यंत वास्तवतापूर्ण अशी ही कविता अुत्तानतेमध्ये लावणीवाङ्मयास बरीच निकट येअील.

कलावती या कवितेंत कल्पनाशक्तीचा प्रभाव वर्णन केला आहे. हें वर्णन नावीन्यपूर्ण नसलें तरी ओजस्वी आहे. मुक्तच्छंदाची शिफारस करतांना तो मूकतेनें वाचावा, त्यांतील अंतःशब्दसंगीत ध्यानांत घ्यावें, व ओळींच्या मधील अर्थ ध्यानीं घ्यावा असें सांगितलें जातें. हें सारें करूनहि कलावती ही कविता रसदृष्ट्या फारशी आस्वाद्य वाटत नाही.

मुक्तच्छंदांच्या गीतांचा अेक चांगला संग्रह म्हणून या पुस्तकाचा निर्देश खात्रीनें करतां येअील. भावघन शब्दांची योजना श्री. रेगे अुत्कृष्ट करतात आणि म्हणूनच यापुढील त्यांचीं मुक्तच्छंद कवनें अधिकाधिक सरस अुतरतील असें म्हणावेंसें वाटतें.

वि. म. कुलकर्णी

## कथा-कादंबरी—

**उगवत्या सूर्याचा काळोख**—ले० वि. वा. हडप; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य रु. ३.

**अण्णा**—ले० श्री. बा. वा. फाटक; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य रु.१॥.

**नो पासारन्**—प्रका० गंगाधर विष्णु आपटे; लोकसाहित्य, मुंबअी ४; मूल्य रु. ३

**शेक्सपियरच्या नाट्यकथा**—श्री. रा. ना. झोळ; प्रका० वत्सला साहित्य प्रकाशन; मूल्य रु. २.

प्रसिद्धकादंबरीलेखक श्री. वि. वा. हडप यांची अुगवत्या सूर्याचा काळोख—अेक नवी कादंबरी आहे. श्री. हडप हे स्वतःस कम्युनिस्ट म्हणवतात, आणि त्यामुळे चालू युद्धाविषयी त्यांच्या पक्षाचा अेक विशिष्ट दृष्टिकोण आहे. त्या दृष्टिकोणाचा पाठपुरावा त्यांनी या ग्रंथांत केला आहे. अिंग्रजी अंमलांतील अनेक जुलुमांस कंटाळलेले जे लोक जपानचें स्वागत करीत आहेत त्यांना सावध करणें हा या कादंबरीचा हेतु आहे. जपान आपणांस स्वातंत्र्य मिळवून देणार या आशेने हुरळून गेलेल्यांना जपानी अंतःकरणांतील हिणकस माग दाखवून शुद्धीवर आणावें अशा तळमळीने लेखकाने ब्रह्मदेशाच्या आमपासचें व १९४३ च्या अुत्तरार्धांचें वातावरण चितारलें आहे. ब्रह्मदेशांत जपानने शिरकाव कसा केला व शेवटीं किती भयंकर मार्गाने विश्वासघात केला हें त्यांनी अनेक सत्य घटनांच्या आधारें दाखविलें आहे. जपानला वश झालेले ब्रह्मी कार्यकर्ते, ब्रह्मी लोकांना बनविणारे जपानी सूत्रधार, त्या सूत्रधारांना विरोध करीत देशबांधवांस सावध करतांना प्राणार्पण करणारे (कम्युनिस्ट ?) असे निरनिराळे लोक यांत रंगवले आहेत. परंतु हे तीन विचारप्रवाह ज्या कथानकांत गुंतवले आहेत तें कथानक व ते विचार बोलणारीं 'ध्वनिक्षेपक' पात्रें मात्र फारशीं जिवंत वाटत नाहीत. त्यापेक्षा कथेच्या मोहांत न पडतां श्री. हडपांनी अुघड अुघड जपानी आक्रमणाचा अितिहास लिहिला असता तर तो ज़ास्त अुद्बोधक झाला असता. जपानविषयीं असा भोळा भाव धारण करणारे मूर्ख या देशांत नाहीत असें नाही. स्वातंत्र्य म्हणजे परसत्तेची खांदेपालट असें समजणारे आपल्या मूर्खपणाचें, गाफीलपणाचें प्रायश्चित्त भोगल्याखेरीज राहणार नाहीत. परंतु या भोळया लोकांना सावध करण्याच्या निमित्ताने राजकीय क्षेत्रांतील आपल्या प्रतिपक्षांनाहि झोडपण्याची जी विचारसरणी लेखकाने अवलंबिली आहे ती अुद्वेगकारक आहे असें म्हटल्यावाचून राहवत नाही. सोशॅलिस्ट पक्षाशीं कम्युनिस्टांचा मतभेद असेल, आहे. तीव्र मतभेद आहे. परंतु केवळ मतभेदावरून परिस्थितीच्या अनुकूलतेचा फायदा घेअुन त्यांना वरील भोळसर लोकांत जमा करणें हें संधिसाधूपणाचें लक्षण आहे. जपानवर विश्वास ठेवणें हें मूर्खपणाचें आहे हें मान्य करावयाचें म्हणजे लगेच ब्रिटिशांच्या युद्धहेतूविषयी टाळया वाजवल्याच पाहिजेत असा लेखकाचा आग्रह दिसतो. सर्व कादंबरी वाचीत असतां शेवटीं पृ. २४० वर लेखकाचा हा हेतु स्पष्टपणें व्यक्त झाला आहे. लेखकाने अिंग्लंडच्या ज्या युद्धहेतूची ग्वाही दिली आहे त्या युद्धहेतूशीं सहकार्य करण्याची कम्युनिस्टाप्रमाणे देशांतील अितरहि राजकीय पक्षांची तयारी आहे. परंतु आपला हेतु पटविण्यासारखी कृति या देशाच्या बाबतींत ब्रिटनने करावी, प्रत्यक्ष कृतीचा 'अिसार' द्यावा, अेवढाच अितरपक्षीयांचा आग्रह आहे. तो 'अिसार' मिळाला नाही तर ते लगेच जपानशीं सहकार्य करण्याअितके माथेफिरू किंवा मूर्ख आहेत

असें आपल्या 'पार्टीचें' मत श्री. हडप यांनी या कादंबरीच्या द्वारें रंगविलें आहे. तें त्यांचें प्रतिपादन मतप्रचाराच्या अगदी खालच्या दर्जाच्या पद्धतीचें निदर्शक आहे. असो. जपानी राजकारणाचें अंतरंग दाखविण्यांत श्री. हडप यांनी परिश्रमपूर्वक माहिती मिळविलेली दिसते. ज्या संभाषणांतून मतप्रचार आहे तीं संभाषणें अत्यंत नाटकी वाटतात कारण ती बोलणाऱ्या व्यक्तींना कांहीहि व्यक्तित्व नाही. कोणत्याहि विषयाविषयी लिहितांना श्री. हडप यांची दिसून येणारी अभ्यासु वृत्ति याहि कादंबरींत दिसून येते.

अेका कारकुनाच्या जीवनाच्या द्वारे कारकुनी व्यवसायाचें प्रातिनिधिक चित्र विनोदी पद्धतीने रंगविण्याचा अण्णा हा अेक प्रयत्न आहे. श्री. फाटक यांच्या या प्रयत्नांत प्रा. चिं. वि. जोशी, श्री. शामराव ओक, श्री. वि. मा. दी. यांच्यापेक्षा कांही वैशिष्टय आहे असें प्रस्तावनेंत श्री. बावडेकर यांनी मुद्दाम सांगितलें आहे. अण्णा हें प्रातिनिधिक चित्र आहे असें प्रस्तावनालेखकाचें वाचकास आश्वासन आहे. 'कारकून' ही अेक 'जात' आहे. व्यवसायामुळे जाति अुत्पन्न होतात या समाजशास्त्रीय सिद्धान्ताची ही अेक बाजू आहे. व्यवसायामुळे कारकुनांत कांही विशेष अुत्पन्न होतात. त्या विशेषांचें मनोरम दर्शन अण्णांच्या सहवासांत होतें. श्री. फाटक यांनी अण्णांचें चित्र रंगवितांना त्या व्यवसायाबद्दलच्या सहानुभूतीस कोठेहि धक्का दिला नाही. अण्णांच्या बरोबर चार गप्पागोष्टी करावयास मिळाव्यात असें आपणांसहि वाटूं लागतें. विनोदाचा साधन म्हणून अुपयोग करतांना सर्व घडामोडींत स्वाभाविकपणा टिकविण्याची लेखकाने जास्त दक्षता घेणें जरूर होतें. परिस्थितिजन्य विनोदाचे प्रसंग पाहून अण्णांना हसणारांचा आपणांलाहि राग येतो. 'अण्णा तरी काय करणार बिचारे?' असे अुद्गार वाचकांच्या तोंडून निघतात. परंतु हें सगळें जें मधून मधून अण्णाबद्दल वाटतें त्याचा कारकुनी व्यवसायाशीं कितपत संबंध आहे? व्यवसायाच्या वातावरणांत साध्याभोळ्या जीवांची जी तारांबळ होते ती अनेकांनी रंगविली आहे. त्यापेक्षा हें चित्र प्रातिनिधिक कसें आहे यांची नीट खातरजमा अण्णावरून होत नाही. कारकुनाच्या जगांतलि माणसांचें यापेक्षा स्पष्ट दर्शन दिवाकरांच्या कारकून या नाटयछटेंत (त्यांत भरपूर कारुण्य असूनहि) व श्री. विठ्ठलराव घाटे यांच्या 'कारकून' या शब्दचित्रांतहि दिसतें. असल्या लेखनास विनोद लागतो या रूढीवर लेखकाने फार भर दिल्यानें कांही ठिकाणीं विनोदासाठी फारच ओढाताण झाली आहे. अतिशयोक्तीचा अुपयोग करतांना गाफीलपणामुळे कांही ठिकाणीं अण्णांचें ॲक्टिंग अगदी पडलें आहे. विचित्र मोडकेंतोडकें अिंग्रजी लिहिणें वा बोलणें हा विनोदाचा प्रकार तिंबूनानां-अितका जुना झाला आहे. आजच्या कारकुनांचें अिंग्रजी अण्णापेक्षा पुष्कळ धड असतें. छत्रींत अनेवेळीं परधर्मीय तरुणी सांपडणें यांत प्रातिनिधिक काय आहे? आणि हा प्रसंग सुद्धा जुनाच आहे. अण्णांच्या बाबतींतली सासूबाअींची वागणूक विनोदी करतां करतां बनावट वाटूं लागते. अण्णांच्या गाण्याच्या लहरी या कांही ठिकाणीं प्रसंगाशीं व अण्णांच्या स्वभावाशीं फारच विसंगत वाटतात. छत्रीदुरुस्तीसाठीं ७ रु. १२ आणे खर्च करणारे अण्णा कारकुनाच्या जगांत अपवाद ठरतील. कदाचित् लेखकाचा रोख–पण जाअूं द्या. मिशांसाठी आअीशीं सामना देणारे अण्णा, मोत्यासाठीं रजा घेणारे अण्णा, कोंकणांतील प्रांतविशिष्ट व स्थानविशिष्ट देवधर्मांत सांपडलेले अण्णा हेच निरनिराळे प्राणी वाटतात. मग प्रातिनिधिक वाटणें तर दूरच! कसल्याहि वैशिष्टयाचा हव्यास न बाळगतां श्री. फाटक यांनी अगदी सामान्य जीवनाचीहि सहानुभूतिपूर्वक खेळाडूपणें अशीच वास्तपूस केली तर त्यांचें लेखन वाचकांस खात्रीनें ओढ लावील यांत शंका नाही.

नो पासारान्— 'त्यांना रोखून धरा' अशा अर्थाच्या घोषवाक्याने गर्जणारी ही कादंबरी आहे. अप्टन सिंक्लेअर यांच्या या प्रसिद्ध समाजवादी कादंबरीचा मराठी अनुवाद करून अनुवादक (?) यांनी मराठी वाचकांस अत्यंत अुत्कट अशा अेका स्फूर्तिदायी ललित-कृतीची ओळख करून दिली आहे. स्पॅनिश-लोकराज्याची सेवा करण्याच्या अुदात्त हेतूने सिंक्लेअर यांनी ही कादंबरी लिहिली आहे. लेखक लेखनविषयाशीं पूर्णपणें तादात्म्य पावला म्हणजे त्याच्या कृतींत कसें सामर्थ्य आणि तेज असतें याचें हा ग्रंथ हें अेक अुत्कृष्ट अुदाहरण आहे. आपल्या अनुभवाचें पंगुपण झांकण्यासाठी, आपल्या ठिकाणच्या तत्त्वशून्यतेवर पांघरूण घालण्यासाठी, आपल्याकडील नामवंत लेखकांनी प्रचार आणि कला यांचा कृत्रिम लढा अुमारला आहे. प्रचाराने कला हिणकस होते असें मोठें गोंडस तत्त्व त्यांनी आत्मरक्षणासाठी आपल्या गळयांत अडकवलें आहे. परंतु 'नो पासारान्'सारखी कादंबरी वाचल्यावर वरील तत्त्वांतील फोलपणा आणि पोरकटपणा आपल्या सहज लक्ष्यांत येतो. 'सामाजिक न्यायाचा धर्मयोद्धा' असें श्री. के. महमद अब्बास यांनी सिंक्लेअरला संबोधिलें आहे. त्या धर्मवीराच्या वीरश्रीचा परिचय मराठी वाचकांस खात्रीने होअील. सिंक्लेअरने सामाजिक न्यायाच्या प्रगतिशील प्रवृत्तींचा पुरस्कार करण्यासाठी लेखणी हातांत धरली आणि लेखणीला कोठेहि कमीपणा येअूं न देतां आपलें कार्य यशस्वीपणें चालू ठेवलें. या कादंबरींत त्याच्या लेखणीचे अभिजात गुण ठिकठिकाणीं दिसतात. 'रूढि मेसर' या अेका भावनाप्रधान व संस्कारक्षम तरुणाच्या जीवनांत मिस्टर ते कॉमरेड हें झालेलें स्थित्यंतर दाखविण्यांत लेखकाने मानवी मनाचा आपला सूक्ष्म अभ्यास व्यक्त केला आहे. मांडवलशाही समाजांतील अगदी खालच्या थरांतील कुटुंबाचें जीवन रंगवितांना लेखक जें कौशल्य दाखवितो तेंच इझ्झीसारख्या कामगारामोवतींचें जीवन रंगवितांना दिसून येतें. 'रूढी' या तरुणाच्या जीवनाची कथा ही नव्या समाजपद्धतींतील तरुणाच्या जीवनाचें प्रातिनिधिक चित्र आहे. रूढीसारख्या तरुणाला सुखवादी, व्यवहारी, ध्येयशून्य समाजाच्या छपराखाली दडून फार वेळ स्वतःचा बचाव करतांच येत नाही. कॉलेजच्या जीवनांत त्याच्यापासून लपविलेलें सत्य त्याला बाहेरच्या जीवनाच्या वाटेवर कोठे तरी गाठल्याखेरीज राहणार नाही. कारण, बाहेरच्या जगांत जीवनाशीं खुला खुला व्यवहार करणारे अिझ्झी मनमोकळेपणें वावरत आहेत. 'पासेरो' पा ! (त्यांना रोखून धरा !) अशी कितीही हाकाटी झाली तरी, 'नो पासारान्' असें कोणीं कितीही दटावलें तरी, त्यांना कोणी थांबवूं शकत नाही. मृत्यूसुद्धा त्यांना थोपवूं शकत नाही. कारण मृत्यूलाही पुरून अुरण्याअितकें सामर्थ्य त्यांच्या कनिष्ठ जीववांतून जन्मास येत आहे. वंश, अिभ्रत, चैन यांना बिलगून सुखी होअूं पाहणाऱ्या रूढीला याच सामर्थ्याने ध्येय दाखविलें. 'या सामर्थ्याचें साक्षात् दर्शन रूढीला माद्रिदला दिसलें. लोकयुद्ध ही काय चीज असते, लोकयुद्ध नांवाच्या युद्धांत कोण लोक असतात, ते युद्धांत काय काम करतात, त्या युद्धांतल्या त्यांच्या सामर्थ्याचें स्वरूप व अुगम कसे असतात हें कळण्यासाठी रूढीच्या तुकडीबरोबर आपण स्पेनमध्ये (या कादंबरींतूनच !) फेरफटका मारला पाहिजे ! रूढीच्या जीवनांत अुत्पन्न झालेल्या द्वंद्वाचें स्वरूप रंगवितांना लेखकाने प्रतिगामी व पुरोगामी शक्तींच्या स्वरूपावर चांगला प्रकाश पाडला आहे. रूढीच्या पाठोपाठ त्याला 'वांचविण्यासाठी' वेळेवर त्याच्यावरच हत्यार अुपसण्यास सिद्ध असलेला अर्नेस्टहि किती बलवान् आहे हेंहि लेखकाने प्रामाणिकपणें रंगविलें आहे. प्रत्यक्षाशीं दाट परिचय व दिसतें तें नीट पाहण्याची अवलोकनशक्ति या गुणांमुळे कादंबरींतील कथाप्रसंग डोळ्यांसमोर जिवंतपणें अुभे राहतात आणि वाचन संपलें तरी मनांत तरंगत राहतात !. सिंक्ले-

अरच्या कृतींचा परिचय करून देण्याचा अुपक्रम 'लोक-साहित्य' या प्रकाशनसंस्थेने केला आहे. त्या अुपक्रमाचें मराठी वाचक अंतःकरणपूर्वक स्वागत करतील यांत शंका नाही !

शेक्सपीअरच्या सुप्रसिद्ध आठ नाटकांचा कथारूपाने सुंदर अनुवाद **शेक्सपीअरच्या नाट्यकथा** या पुस्तकांत श्री. रा. ना. झोळ यांनी केला आहे. हा अनुवाद करतांना लँबची अनुवादपद्धति लेखकाने डोळ्यांसमोर ठेवली आहे. त्यामुळे हा ग्रंथ फार सुबोध व रसाळ झाला आहे. अनुवादक या दृष्टीने लेखक मूळ ग्रंथाशीं समरस झाले आहेत हें कथांतील सहजतेवरून दिसतें. शेक्सपीअरचा ग्रंथ पुढे ठेवून मराठीकरण करण्याचे जे अितर प्रयत्न झाले आहेत त्यांत मराठी ग्रंथ क्लिष्ट झाल्याचें अनुभवास येतें. त्यापेक्षा मूळ नाटकांतील कथानकाशीं समरस होअून मग मराठीकरण करण्याची श्री. झोळ यांची पद्धति यशस्वी ठरली आहे. मूळ नाटकांतील बराच भाग लँबने गाळला आहे व लँबचेंच अनुकरण करून श्री. झोळ यांनी मराठी वाचकांस स्वतंत्रपणें समजेल असें कथेचें सुटसुटीत रूप केलें आहे. दोन शब्दांत त्यांनी व्यक्त केलेली अपेक्षा या ग्रंथाने खात्रीने सफल झाली आहे.

## चरित्रें—

**स्मरणसांखळी**—ले० श्री. कमलाबाई देशपांडे; प्रका० मनोहर म. केळकर, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. ६.

**जीवनकथा** (आत्मचरित्र)—ले० ना. गो. चापेकर; प्रका० ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य रु. ६.

**ना. डॉ. खरेचरित्र**—ले० ज. रा. जोशी; प्रका० सौ. सुशिलाबाई जोशी, नागपूर; मूल्य ३॥ रु.

**रा. ग. स. मराठेचरित्र**—प्रका० ग. स. मराठे; शिवाजीनगर, पुणें; मूल्य रु. ४.

**डॉ० भडकमकर गौरवग्रंथ**—प्रका० वि. शं. वैद्य, पुणें २; मूल्य रु. ५.

श्रीमती कमलाबाअी देशपांडे यांच्या 'चिमण्या' ज्यांनी पाहिल्या असतील त्यांना त्यांच्या 'स्मरण-सांखळी'बद्दल कुतूहल अुत्पन्न झालें तर आश्चर्य नाही. त्यांच्या 'चिमण्या' तशाच गोड होत्या. 'स्मरण-साखळी' हें त्यांचें आत्मचरित्र वाचल्यानंतरें वाचकांच्या अपेक्षा विफल होणार नाहींत असा भरंवसा वाटतो. श्रीमती कमलाबाअींना आपल्या जीवनांत अनुकूल वातावरणाची बैठक मक्कम लाभलेली आहे. मूर्तिमंत रसिकतेच्या अंगाखांद्यावर खेळण्याचें भाग्य त्यांना लाभलें आहे; अक्षरशः साहित्याच्या माहेरघरीं त्या लहानाच्या मोठ्या झाल्या आहेत; डॉ. ह. रा. दिवेकर व प्रा. वा. म. जोशी यांच्यासारख्या विद्वान् व रसिक शिक्षकांचें शिष्यत्व व दीर्घ सहवास यांचा त्यांना लाभ झालेला आहे. 'स्मरण-सांखळीं'त या मंडळींच्या ऋणाची छाप लपून राहिली नाही. सुरवातीसच मलपृष्ठावर घातलेल्या "कधीं पुनव अुजळे, कधीं आवस काजळे। सयांतुनी सअी माझे, सुख मिळे, विख मिळे॥" या कोमल ओवीनेच कमलाबाअींच्या रसिकतेची पहिली खूण पटते. आत्मचरित्राची सुरवातच त्यांनी मोठ्या कलात्मक पद्धतीने केली आहे. "माझा जन्म..." अशा ठराविक पद्धतीने सुरवात करून आपलें गोत्र, आपली शाखा अित्यादि जंत्रीवजा निरुपयोगी नसली तरी नीरस हकीकत देअून वाचकांच्या सहनशीलतेची परीक्षा पाहण्याचा आग्रहीपणा लेखिकेने दाखविला नाही ही तिच्या

रसिकपणाची व औचित्यज्ञतेची दुसरी खूण. वाचकाला आत्मचरित्रकाराच्या व्यक्तित्वाचें चित्र मुख्यतः पाहावयाचें असतें. त्यावर ज्या व्यक्तींचा प्रत्यक्ष परिणाम झाला असेल त्यांचें वर्णन आत्मचरित्रांत यावें हें योग्य. कमलाबाईंनी आपली जन्मतारीख, जन्मकुंडली वगैरे कांही दिलें नाही, तरी त्यांनी रेखाटलेल्या स्वतःच्या व्यक्तिचित्रांत कांही कमी पडलें नाही. आपली बाल्यावस्था, विद्यार्थिदशा व जीवनप्रवेशदशा यांचें चित्र त्यांनी अेखाद्या कसलेल्या चित्रकाराच्या कौशल्याने रेखाटलें आहे. कुंचल्याच्या चारदोन फटकाऱ्यांनी अुत्कृष्ट चित्र रेखाटण्याची कला त्यांच्या लेखणींत आहे. हा सगळांच भाग नितान्तसुंदर असून लक्ष्मीबाअी टिळकांच्या लेखनपद्धतीची आठवण करून देणारा आहे. त्यांनी दिलेल्या निरनिराळ्या आठवणींमध्ये त्यांचा मनमोकळेपणा, त्यांची कलात्मकता; त्यांची विनोदबुद्धि यांचा प्रत्यय येतो. "(गोखले तात्या) यांना मुलांत मिसळायची आवड. आमच्याबरोबर सागरगोटे खेळतील, तसेंच कपबशांची झाडें अुगवावीं म्हणून कपबशांचे फुटके तुकडेहि कुंड्यांत पुरून यायवास यार" अशीं कोमल-विनोदपूर्ण वाक्यें आणि "स्मृतिभूत गोष्टी भिंतीवरील लामणदिव्याने दिसणाऱ्या सावलीप्रमाणे जास्तच लांब दिसतात" अशा मार्मिक अुपमा अित्यादि 'स्मरणसांखळी'त जागोजाग विखुरलेल्या दिसतील. तीन वर्षांचा स्वल्प वैवाहिक जीवनाचा भाग वर्णितांना कमलाबाअींनी पराकाष्ठेचा संयम प्रकट केला आहे. त्या कालाला अगदी क्षणभर टिकणाऱ्या परंतु किती तरी मोठें वाटणाऱ्या स्वप्नाची त्यांनी दिलेली अुपमा किती सार्थ आणि मार्मिक आहे ! त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे त्यांनी या स्वप्नाचें वर्णन 'स्वप्नगत शब्दांनी'च केलें आहे !

'स्मरणसांखळी'तील यापुढचा म्हणजे कर्व्यांच्या संस्थेशीं कमलाबाअींचा सेवक या नात्याने संबंध आला त्या वेळचा भाग पूर्वभागाअितका रम्य अुतरला नाही. याचें कारण अुघड आहे. या ठिकाणीं त्यांच्या सार्वजनिक जीवनाचें वर्णन आलें आहे. सार्वजनिक जीवन म्हटलें म्हणजे मांड्यावर भांडें आपटण्याचे प्रसंग वारंवार यावयाचे, मतभेद व्हावयाचे; आणि या मतभेदांत घरगुती जीवनांतील मतभेदांचा जिव्हाळा व प्रेम मिळणें कठिण. त्यामुळे त्यांत तीक्ष्णता येते, माणसा-माणसांतील गोडवा नष्ट होतो. या अनुभवांनी मनुष्य आंबल्यासारखें होतें व प्रतिस्पर्ध्यांवर राग काढूं लागतें. तसें करतांना आत्मसमर्थन व क्वचित्प्रसंगीं परनिंदेचाहि थोडाफार लेप लागणें अपरिहार्य होतें. "हिंगण्याबद्दलच्या सुरवातीच्या माझ्या कल्पना फार मोठ्या होत्या; त्या ठिकाणीं हेवेदावे नाहीत, मत्सर नाही, प्रत्येक गोष्ट येथें परोपकाराचे दृष्टीनेच केली जाते. फार काय पूर्वीच्या तपोवनाप्रमाणे वाघ, सिंह व हरिणी अेकत्र पाणी पितात असें हें ठिकाण असणार असें मला वाटे. पण अनुभवांतीं तें चुकीचें ठरलें. शेवटीं वाघसिंह ते वाघसिंहच राहतात व हरिणी त्या हरिणीच ! सिंहाचा वाटा (Lion's share) शेवटीं बहुमताचा सिंह ताब्यांत ठेवणारालाच मिळतो." हा अनुभव आल्यामुळे कमलाबाअी कावल्यासारख्या झालेल्या दिसतात. या सर्व मानगडींची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. अेवढें खरें की या भागाचें अितकें तपशीलवार वर्णन कमलाबाअींनी केलें नसतें तर बरें झालें असतें. कमलाबाअींचा तो स्वाभाविक संयम या ठिकाणीं कसा लुप्त झाला, कुठल्या कांट्याकुट्यांत कमलाबाअी शिरल्या, असे अुद्गार वाचकाच्या तोंडून सहज बाहेर पडतात. पोटांतली मळमळ ओकून टाकल्याशिवाय बरें वाटत नाही हेंच त्याचें स्पष्टीकरण. कांही असो, कमलाबाअींच्या सुंदर जीवनांत हा भाग यावयास नको होता, त्याप्रमाणे या सुंदर पुस्तका-

तरि हा भाग— निदान अितका विस्तारपूर्वक— यावयास नको होता असें म्हटल्याशिवाय राहवत नाही. अ. म. जोशी

**जीवनकथा :** रा.सा. चापेकर हे सत्तरी अुलटलेले वयोवृद्ध गृहस्थ आहेत; म्हणजे आत्मचरित्र लिहिण्याच्या अवस्थेपर्यंत पोंचलेले आहेत. आयुष्याकडे दृष्टि टाकण्यास विशिष्ट अवस्थेपर्यंत पोंचावें लागतें असें म्हणतां येअील. डोंगर चढून जाणारास कांही अुंचीपर्यंत चढून गेल्यानंतर मागे वळून पाहण्याने आनंद होतो. दहापांच पावलें चढून गेलेल्यास हा आनंद लाभत नाही. दीर्घकालपर्यंत विविध प्रकारचे अनुभव घेतल्यानंतर त्यांच्या आठवणी काढण्यांत मौज वाटते. नानाप्रकारचे अनुभव घेतलेल्या मनुष्यास 'कांहीतरी सांगावेंसें' वाटणें साहजिक आहे. अर्थात् प्रत्येकास तसें वाटेलच असें म्हणणें चुकीचें होअील. तसें असतें तर प्रत्येक मार्वेत आहेत त्यापेक्षा कितीतरी अधिक आत्मचरित्रें झालीं असतीं. रा. सा. चापेकर यांना 'कांहीतरी सांगावयाचें' आहे ही गोष्ट केवळ त्यांनी आत्मचरित्र लिहिलें आहे अेवढ्यानेच सिद्ध होत नाही; त्यांची 'जीवनकथा' वाचल्यावर त्याचा चांगला प्रत्यय येतो. चापेकर हे मराठीचे साक्षेपी लेखक आहेत, राजमान्यतेचा शिक्का मिळविलेले सरकारी नोकर आहेत, अनेक सार्वजनिक संस्थांशीं संबद्ध असलेले कार्यकर्ते आहेत, अुत्साही प्रवासी आहेत, मित्रांना अुत्तम मित्र आहेत व आप्तांना प्रेमळ आप्त आहेत, असें त्यांचें आत्मचरित्र दाखवितें. चापेकरांना आपली 'जीवनकथा' सांगावीशी वाटली याचें मुख्य कारण ते जीवनाबद्दल विचार करणारे आहेत हें होय. शिवाय पत्रें व दैनंदिन्या ठेवण्याची त्यांना संवय आहे (जीवनकथा पृ. २९६). म्हणजे आत्मचरित्राला आवश्यक असलेली साधनसामग्री त्यांजवळ आहे, अनुभवसंपन्नता आहे व जीवनाबद्दल विचार करण्याची शक्ति व अिच्छा आहे; याचा परिणाम त्यांच्या 'जीवनकथे'च्या रूपाने आपणांसमोर आहे.

परंतु अेवढ्याने अुत्कृष्ट आत्मचरित्राची सिद्धता झाली असें होत नाही. त्याकरिता आणखी कांही गोष्टी लागतात. त्यांत तटस्थवृत्तीने स्वतःकडे पाहण्याची शक्ति व लेखनलालित्य या प्रमुख होत. वरील सर्व गुणांचा योग्य मिलाफ झाल्यामुळे हिंदवी वाङ्मयांतील दोन आत्मचरित्रें जगाच्या वाङ्मयांत श्रेष्ठ स्थान मिळविण्याच्या योग्यतेचीं झालीं आहेत. अेक महात्मा गांधींचें आत्मचरित्र व दुसरें लक्ष्मीबाअी टिळक यांचें. गांधींच्या ठायीं असलेली कठोर आत्मपरीक्षणाची शक्ति जगप्रसिद्ध आहे. ते ललितलेखक म्हणून प्रसिद्ध नाहीत; परंतु त्यांच्या भाषापद्धतीची आकर्षकता अवर्णनीय व अनुकरणीय आहे. गुजराती भाषेला त्यांनी निश्चित स्वरूपाचें वळण लाविलें असून आजचे प्रमुख गुजराती लेखक त्यांच्या लेखनपद्धतीचें अनुकरण करण्यांत अभिमान बाळगणारे आहेत. यामुळें त्यांच्या आत्मचरित्रांत तटस्थवृत्ति व लालित्य यांचा सुरेख संगम झाला आहे. लक्ष्मीबाअी टिळकांचीं 'स्मृतिचित्रें' या गुणांच्या बाबतींत गांधींच्या आत्मचरित्रापेक्षाहि कांकणभर श्रेष्ठ ठरतील. चापेकरांच्या तटस्थवृत्तीसंबंधी अेवढें म्हणतां येअील की त्यांनी आपल्या गुणदोषांची चर्चा मोकळेपणाने केली असली तरी महात्मा गांधी किंवा लक्ष्मीबाअी टिळक यांच्या मानाने त्यांना ती फार कमी प्रमाणांत साधली आहे. 'आत्मचरित्रलेखकाला आत्मश्लाघेच्या आरोपाची भीति बाळगावी लागते' (प्रस्ता. पृ. ३) हें चापेकर जाणतात. स्वतःच्या गुणदोषांची चर्चा निर्विकारमनाने व तटस्थवृत्तीने करणें हें अत्यंत कठिण कर्म आहे. या दृष्टीने आत्मचरित्रलेखन म्हणजे तारेवरची कसरत होय हें खरेंच. ही कसरत करावी गांधींनीच. परंतु सामान्य मनुष्यालाहि आपल्या गुणदोषचर्चेला आत्मश्लाघेचा अुग्र दर्प येअूं नये अेवढी काळजी घेणें अशक्य नाही. "या बारीक गोष्टीने माझ्या

स्वभावावरहि प्रकाश पडण्याचा संभव आहे" (पृ. ८५); "सरकारी नोकरींत असूनहि ज्या क्षुल्लक गोष्टींत मोटमोठीं घेंडें नांगी टाकतात तेथे मी धीटपणाने वागलों आहें" (पृ. १४५) अशीं वाक्यें गाळलीं असतीं तर त्या अुग्र वासाची तीव्रता बरीच कमी झाली असती असें वाटतें. दुसरें, साधारण प्रत्येक माणसाला– विशेषतः थोर माणसाला– घरगुती व सार्वजनिक असे दोन जीवनप्रकार असतात. पैकी स्वतःच्या घरगुती जीवनाचें अत्यंत मोकळेपणाने व निर्विकारवृत्तीने वर्णन करणारास सार्वजनिक जीवनाचें वर्णन करतांना तितकी निर्विकारवृत्ति ठेवतां येत नाही. जवाहरलाल नेहरू, न. चिं. केळकर व त्यांच्या कन्या श्रीमती कमलाबाअी देशपांडे यांचीं आत्मचरित्रें वाचल्यास याची सत्यता पटेल. सार्वजनिक जीवनामध्ये पक्ष-प्रतिपक्षांचा प्रश्न येतो. त्यावेळीं आत्मसमर्थन, प्रतिपक्षीयांची निंदा वगैरें प्रकार प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या होतातच. तेथेच आत्मचरित्रकाराच्या निर्विकारवृत्तीची खरी कसोटी असते. चापेकर या दोषापासून सर्वस्वीं अलिप्त राहूं शकले नाहीत. प्रतिपक्षीयांचे दोष दाखवूं नयेत असें कोणी म्हणणार नाही. परंतु तसें करण्याची अेक पद्धत असते. साहित्यपरिषदेंतील मुंबअी-पुणें केंद्रवादाची चर्चा करतांना चापेकरांनी "मधल्या काळांत फाटक थोडे मर्जींतून अुतरल्या-कारणाने आळतेकर–पाध्यांचे कल्याण बनले होते" असें वाक्य घातलें आहे. तें सर्वस्वीं सम-तोलपणाचें निदर्शक आहे असें आम्हांला वाटत नाही. अशीं बोचक वाक्यें घातलीं नसतीं व जसा प्रकार घडला तसाच वर्णन केला असता तर बरें झालें असतें. असो. दुसरी गोष्ट लेखनलालित्य. लालित्य हा चापेकरांच्या लेखनाचा विशेष कधीच नव्हता. ("मला सृष्टिवर्णनें करतां येणार नाहीत; तिकडे माझा ओढाच नाही...काव्यमय लिखाणापेक्षा शास्त्रीय लिखाणा-कडे माझा ओढा अधिक" पृ. ३३२). म्हणून कलेची किंवा लालित्याची कसोटी त्यांच्या लेखनाला लावण्यांत फायदा नाही. अेकदोन गोष्टी सांगाव्याशा वाटतात. कालक्रमानुसार चरित्र लिहिण्याने चरित्राला कलात्मकता प्राप्त होतेच, पण याशिवाय मनुष्याच्या व्यक्तित्वाचा विकास त्यांत पाहावयास सांपडतो असें आम्हांस वाटतें. चापेकरांचें मत यासंबंधी भिन्न दिसतें (प्रस्ता. पृ. ५), यासंबंधी वादांत शिरण्याची आवश्यकता नाही. शिवाय चापेकरांनी या ग्रंथांत समाविष्ट केलेल्या कांही प्रकरणांतील (अुदा० स्वप्नें, बदलापूर, दैव) सगळा नाही तरी बराचसा भाग आत्मचरित्रास अनावश्यक वाटतो. पत्रें छापलीं आहेत त्यांत निवड नाही. कांही पत्रें अनावश्यक वाटतात.

चापेकरांनी प्रस्तावनेंत आपली भूमिका स्पष्ट केली आहे ही चांगली गोष्ट आहे. आपलें आत्मचरित्र वंशजांस अुपकारक व्हावें व कुलेतिहासाला साहाय्यक व्हावें ही दृष्टि त्यांनी मुख्यतः ठेवली आहे असें प्रस्तावनेवरून दिसतें. ललितवाङ्मय म्हणून जरी नाही, तरी अेका निःस्पृह व्यक्तीचा त्याच्या वंशजांसच नव्हे, तर अितरांसहि वाचनीय ठरेल असा अितिहास म्हणून 'जीवनकथे'चें महत्त्व केव्हाहि राहील यांत शंका नाही. अ. म. जोशी

नामदार खरे यांच्या बासष्टाव्या वाढदिवसानिमित्त रा. ज. रा. जोशी यांनी त्यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें आहे. बासष्टावा वाढदिवस हा योग चरित्र लिहिण्याकरिता चांगला असला तरी डॉ. खरे यांचें जीवितकार्य अद्यापि संपलें नाही, अुलट वाढत्या अुत्साहाने त्यांनी व्हाअिसरॉयच्या कार्यकारी मंडळावर कार्य करण्याची मोठी जबाबदारी नुकतीच पत्करली आहे, या दृष्टीने त्यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध करण्याचा काल अद्याप आला नाही असें वाटणें साहजिक आहे. शिवाय डॉ. खरे यांच्या राजकीय जीवनांत अुत्पन्न झालेलीं प्रकरणें– विशेषतः

सर्वत्र गाजलेलें 'खरे–प्रकरण'–अद्याप जनतेच्या मनांत अितकीं ताजीं आहेत कीं त्या संबंधानें निर्विकारमनानें विचार करणें चरित्रकाराला फारसें सोपें जाणार नाहीं अशी भीति वाटणेंहि साहजिक आहे. रा. न. चिं. केळकर यांनीं 'टिळकचरित्रां'त काढलेले "टिळकांच्या हयातींत अुठलेल्या वादाच्या धुळीचे लोट जमिनीवर बसण्याला व आरपार स्वच्छ दिसूं लागण्याला अडीच वर्षें सतत खवलेलें विस्मृतीचें दहिंवर पुरें झालेलें दिसत नाहीं" हे अुद्गार खरे यांच्या चरित्राला विशेषच लागू पडतात हें कोणाच्याहि ध्यानांत येअील. 'खरे-प्रकरणां'त सत्य कोणत्या बाजूला होतें याची चर्चा या ठिकाणीं कर्तव्य नाहीं. अेवढेंच कीं केळकरांनीं म्हटल्याप्रमाणे विस्मृतीच्या दहिंवरानें वादाचा धुरळा ज़रा बसल्यानंतर हें चरित्र लिहिलें गेलें असतें तर लेखकाला व वाचकांनाहि त्यासंबंधीं अधिक निर्विकारमनानें विचार करणें सुलभ झालें असतें. सदर चरित्राच्या शेवटीं परिशिष्टें जोडून 'खरे-प्रकरणां'तील मूळ कागदपत्र जसेच्यातसे छापण्याचा लेखकाचा खटाटोप पाहिला म्हणजे हें प्रकरणच प्रामुख्यानें डोळ्यांसमोर ठेवून त्यांतील खरे यांचें निर्दोषित्व सिद्ध करण्याकरिताच लेखक चरित्र लिहावयास प्रवृत्त झाला असावा असाहि किंचित् संशय वाचकाच्या मनांत डोकावतो. अस्तु.

असें असलें तरी रा. जोशी यांनीं खरे यांच्या राजकीय जीवनाचा भाग पुष्कळच समतोलपणानें वर्णिला आहे हें मान्य केलें पाहिजे. 'खरे-प्रकरणा'नंतर लगेच डॉ. खरे यांचें चरित्र त्यांच्या अेका चाहत्यानें लिहिलेलें असावें आणि त्यांत महात्मा गांधी यांना गालिप्रदानाचा अहेर अगदीं अल्प प्रमाणांत लाभावा, अितकेंच नव्हे तर त्यांच्याबद्दल क्वचित्प्रसंगीं स्तुतीचे अुद्गार काढलेले आढळावे, हा अेक अद्‌भुत चमत्कार आहे. तो चमत्कार या चरित्रग्रंथांत घडलेला आहे याबद्दल खरोखर लेखकाचें अभिनन्दन करावयास पाहिजे. डॉ. खरे यांचें व्यक्तिचित्रहि लेखकानें कौशल्यानें रंगविलें आहे. त्यांचा प्रखर देशाभिमान, तत्त्वनिष्ठा, स्पष्टवक्तेपणा व क्वचित्प्रसंगीं फटकळपणा, अुदारवृत्ति, विनोदबुद्धि, हाचे गुण क्वचित् सीमेच्या पलीकडे गेल्यामुळे त्यांतून अुत्पन्न होणारी अुपहासवृत्ति, दुराग्रह व अभिनिवेशांधता अित्यादि डॉक्टरसाहेबांचे स्वभावविशेष निरनिराळ्या आठवणींच्या साहाय्यानें चांगले रंगविले आहेत. कांहीं प्रांतविशिष्ट लकबी सोडल्या तर लेखकाची भाषा सरस व ओघवती आहे. ठिकठिकाणीं घातलेलीं संस्कृत वाङ्मयांतील अवतरणें लेखकाचा व्यासंग व मार्मिकपणा दर्शविणारीं आहेत. तसेंच वेळोवेळीं दिलेले वृत्तपत्रांतील अुल्लेख व भाषणांतील अुतारे रा. जोशी यांच्या परिश्रमाची साक्ष देतात.

अ. म. जोशी

**रा. ग. स. मराठे अॅक्युअरी यांचें चरित्र**–. लोकमान्य टिळकांच्या जहाल व स्फूर्तिदायक राजकारणानें महाराष्ट्रांतील अेका काळची तरुण पिढी राष्ट्रकार्याकडे खेचली गेली. या तरुणांनीं आपापल्या स्वभावधर्माप्रमाणें राष्ट्रकार्याच्या निरनिराळ्या क्षेत्रांत प्रवेश केला. कोणी राजकारणाकडे वळले, तर अितिहाससंशोधन, राष्ट्रीय शिक्षण, वाङ्मय, वृत्तपत्रव्यवसाय, अुद्योगधंदे अित्यादि क्षेत्रांत कित्येकांनीं अुडी घेतली आणि त्या त्या क्षेत्रांत महनीय कामगिरी केली आहे. श्री. ग. स. अुर्फ बाबासाहेब मराठे हे याच तरुण पिढीचे अेक प्रतिनिधि आहेत. त्यांचें नांव विमाव्यवसायाशीं आज ३२।३३ वर्षें निगडित झालेलें आहे. परंतु आपल्या जीवितकार्याचा शोध त्यांना जरा अुशीरा लागला. शिक्षण संपादन केल्यानंतर सरकारी नौकरी करावयाची नाहीं असा निश्चय त्यांनीं केला आणि पुण्याच्या सार्वजनिक जीवनांत आपल्याला आवडेल असें कार्यक्षेत्र ते शोधूं लागले. टिळकपक्षांतील अेक कर्तबगार तरुण म्हणून त्यांनीं लौकरच लौकिक संपादन केला. याच कालखंडांतील त्यांचें अेक प्रमुख कार्य

म्हणजे वसंतव्याख्यानमालेचें पुनरुज्जीवन होय. हिंदुस्थानांत ॲक्चुअरीच्या दोन परीक्षा दिल्यानंतर ते पुढील अभ्यासाकरिता अिंग्लंडला गेले आणि १९१३ सालीं तेथून परत आल्यापासून विमाव्यवसाय हेंच त्यांचें जीवितकार्य झालें. कन्सल्टिंग ॲक्चुअरी म्हणून त्यांनी स्वतंत्र व्यवसाय सुरू केला आणि त्यामध्ये ते अग्रेसर झाले. श्री. बाबासाहेबांनी या व्यवसायास प्रारंभ केला त्या वेळीं या धंद्याचें स्वरूप अितकें विलोमनीय नव्हतें. या व्यवसायाला मान्यता मिळवून देणें व त्याचें स्थिरीकरण करणें असें दुहेरी कार्य करून नवीन पिढीला त्यांनी अेक नवा धंदा अुपलब्ध करून दिला आणि विम्याच्या पोटीं परदेशीं जाणाऱ्या द्रव्याचा प्रवाह थांबविला, हें त्यांचें कार्य विशेष अुल्लेखनीय आहे.

प्रस्तुत चरित्राचा कांहीं भाग प्रसिद्ध तरुण लेखक श्री. निरंतर यांनी लिहिला आहे. कार्यबाहुल्यामुळे त्यांना हें काम पुरें करतां आलें नाहीं म्हणून पुढील भाग श्री. बाबासाहेब यांनी स्वतःच लिहिला आहे आणि तोहि त्रयस्थ जसा लिहील त्या पद्धतीने, हा अेक प्रस्तुत चरित्राचा विशेष नमूद करण्यासारखा आहे. श्री. बाबासाहेबांच्या विचारभूमिकेचें यामध्ये विस्ताराने वर्णन आलेलें आहे. नैतिक व धार्मिक विचार, थिऑसफीचा स्वीकार, सामाजिक व शिक्षणविषयक मतें, साहित्यसेवा अित्यादि प्रकरणांतून त्यांची वैचारिक भूमिका अुठावाने मांडली गेली आहे. ज्या पिढीचे प्रतिनिधि म्हणून श्री. बाबासाहेब यांना संबोधतां येअील त्या पिढींतील विचारप्रवाहांचे वारे कसे वाहत होते याचें सम्यग् निदर्शन वाचकांना येथें पाहावयास मिळेल. हें चरित्र पुरें प्रातिनिधिक होण्याच्या दृष्टीने यांतील हा वर्णनात्मक भाग अधिक वस्तुनिष्ठ रीतीने लिहिला गेला असता तर बरें झालें असतें. श्री. रा. पारसनीस

"डॉ. भडकमकर गौरव ग्रंथ"— डॉ. नानासाहेब देशमुख व डॉ. भाटवडेकर यांच्यानंतर महाराष्ट्रांत ज्या डॉ. महाशयांचा मोठा लौकिक झाला ते डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर होत. गाढ विद्वत्ता, अचूक रोगनिदान, परोपकार व राष्ट्रहितैषी वृत्ति या गुणांमुळे भडकमकरांच्याविषयीं लहानथोरांना आपुलकी वाटते. सामान्यतः विद्वानांत किंवा धनिकांत असलेली आढ्यता किंवा तुसडेपणा डॉक्टरमजकुरांत नाहीं. त्यांनी कितीतरी गरिबांवर अुपकार केले आहेत व कितीतरी संस्थांना मदत दिली आहे; पण स्थितप्रज्ञाप्रमाणे ते वागत असून आपल्या अुपकारकृत्यांबद्दल कोठे टिमकी वाजवीत नाहींत की दुसऱ्यांना कृतघ्नतेबद्दल शिव्याशाप देत नाहींत.

डॉ. भडकमकर यांना ६१ वें वर्ष लागल्याबद्दलचा आपला आनंद व्यक्त करण्यासाठी त्यांच्या चाहत्यांनी अेक सत्कारसमिति स्थापन केली व या समितीने प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित केला आहे.

सुमारें सव्वातीनशें डेमी पृष्ठांच्या या ग्रंथांत शंभरावर लेखकांचे प्रशस्तिलेख आहेत. आरंभीं 'प्रावीण्या'चे संपादक श्री. का. म. ताम्हनकर यांनी सुमारें १२५ पानांचें चरित्र फार जिव्हाळ्याने लिहिलें आहे. 'दादां'च्या सर्व बाजू त्यांत आल्या आहेत. 'गौरवगुच्छ' व 'विविध-स्मृति' या दोन भागांत अनेकांनी डॉक्टरसाहेबांविषयीं आपापल्या आठवणी व प्रशंसोद्गार दिलेले आहेत. प्रस्तावनेंत श्री. तात्यासाहेब केळकर यांनी १ अुद्योग, २ अुत्साह, ३ अुत्तेजन, ४ अुपकारबुद्धि व ५ अुदारत्व या पंच अुकारांत हें गुणवर्णन बसतें असें जें म्हटलें आहे याची प्रचीति या गौरवलेखांत दृष्टीस पडते. पाश्चात्य वैद्यकाची पदवी घेअून धंदा करणाऱ्या अेका विख्यात पंडिताने आयुर्वेदाचा पुरस्कार करावा, अेवढेंच नव्हे तर देशी वैद्यक बोर्डाचा






अध्यक्ष व्हावें यापरती दुसरा स्वाभिमान कोणता ? तसेंच पाश्चात्य विद्येची मदिरा चाखूनहि आपल्या सनातनी भक्तिमार्गाची कास धरावी हें दृश्य विचारप्रवर्तक नाही काय? देशांत अुद्योग-धंदे निघावेत व कलाकौशल्याला अुत्तेजन मिळावें म्हणून निढळाच्या घामाने व अंगच्या खऱ्या गुणांनी मिळविलेल्या संपत्तीची अुधळपट्टी करणाऱ्याहून देशासाठी फकिरी पत्करणारा ज़ास्त मोठा आहे काय ? राष्ट्रीयवृत्ति बाणलेला श्रीमान् वैद्य किंवा वकील लो. टिळकांच्या पिढींत पुष्कळ होअून गेले असतील पण आज कमी आहेत, याची खंती डॉ. मडकमकर यांच्या मूर्तीकडे पाहून क्षणभर मावळते.

प्रस्तुत गौरवग्रंथांत अेक वैगुण्य वाटतें तें असें की, याला वाङ्मय किंवा अितिहास किंवा शास्त्र असें कांही अेक अंग नाही. त्यामुळे नियतकालिकाप्रमाणे हा असून याचा अुपयोग सार्वकालिक होणार नाही. भांडारकर, काणे, पाठक अित्यादि विद्वानांचे गौरवग्रंथ जसे त्यांच्या स्तुतीनेच भरलेले नसून त्यांच्या स्मरणार्थ विविध विषयांवरील विद्वानांनी लिहिलेल्या लेखांची अेक मंजूषा या स्वरूपाचे असतात व त्यामुळे त्यांना चिरकालीन महत्त्व प्राप्त होत असतें, तसें कांही वाङ्मय या ग्रंथांत नाही. अेखादा निराळा खंड किंवा प्रकरण या प्रकारचें पाहिजे होतें. वैद्यकशास्त्र, संगीतादि कला, गुडशर्करानिर्माणशास्त्र, विमाव्यवसाय यांसारख्या विषयांवरचे संशोधनपर लेख छापले गेले असते तर दुधांत साखर पडती. असो. आम्हीहि डॉ. मडकमकर यांना दीर्घायुरारोग्य व अधिक देशकार्य चिंतितों.

चिं. ग. कर्वे

बडोद्याचे दुसरे सयाजीराव महाराज यांच्या अठ्ठावीस वर्षांच्या कारकीर्दीपैकी प्रथम सहा वर्षांतील कागदपत्रें 'बडोदें राज्यदप्तरांतील अैतिहासिक वेंचे' या खंडांत आलेलीं आहेत. सयाजीरावांचें खरें स्वरूप यानंतर पुढेच स्पष्ट व्हावयाचें आहे. यामुळे या खंडांत सुप्रसिद्ध धाकजी दादाजीबद्दल पोतदारीचे किरकोळ निर्देश, गव्हर्नर अेल्फिन्स्टनची भेट अशा कांही गोष्टींहून विशेषसे राजकारणी अुल्लेख आलेले नाहीत. तथापि ज्ञातिभोजन, पञ्चगव्य, बडोद्यास नारळी-पोफळीची लागवड करण्यासाठी श्रीवर्धनाहून आणविलेले दोन भंडारी, १८२० तील दुष्काळी परिस्थितीला तोंड देण्यासाठी धान्यभावांचें नियंत्रण व व्यापाऱ्यांनी फाजील सांठा करण्याविरुद्ध आज्ञा, १८२३ त आयर्लंडमध्ये दुष्काळ पडला असतांना बडोद्यांतून तिकडे पाठविलेली आर्थिक मदत, धोब्यांचा संप अशा कांही प्रस्तुत कालाचेंहि स्मरण करून देणाऱ्या मनोरंजक नोंदी आढळतात. प्रस्तुत खंड ठराविक पद्धतीने सूची वगैरेंनी युक्त असून सचित्र आहे. बडोदें राज्याच्या अितिहासाच्या दृष्टीने प्रस्तुत प्रकाशनाचें महत्त्व फिरून वर्णन करण्याची अर्थात् आवश्यकता नाहीच.

'जुनागड' हें काठेवाडांतील सौराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संस्थान. त्याची राजधानी जुनागड. या नांवाच्या छोट्या पुस्तिकेंत या भूमीशीं संबद्ध असलेला अतिप्राचीन, प्राचीन व रोमहर्षण असा अर्वाचीन अितिहास, भूवर्णन, संस्थानांतील साधुसंत, गिरनार, सोमनाथादि धर्मक्षेत्रें, निसर्गरम्य स्थानें अित्यादींचें त्रोटकपणें सुरस वर्णन दिलेलें आहे. प्रकरण दोन, तीन यांमधील अितिहासांत स्वामिभक्ति, पातिव्रत्य, शौर्य अित्यादि गुजराती प्रजेला ललामभूत गुणांचीं स्फूर्तिदायक अुदाहरणें बालवाचकांना स्फूर्तिदायक झाल्याशिवाय राहणार नाहीत. प्रा. गोगटे यांनी स्वतः घेतलेलीं छायाचित्रें वगैरे देअून पुस्तक सुदर्शन व संग्राह्य केलें आहे.

दि. वि. काळे

## विविध—

भटक्याची कमाअी— ले० अुमाकांत भेंडे, ओीस्ट अँड वेस्ट बुक हाअुस; मूल्य रु. २-०-०.

त्रिलिंगदेशांतील दैनंदिनी—ले० कृष्णाकुमार, अम्.अे. प्रका. ग. ना. अंबेकर, मूल्य रु. २-०-०.

'भटक्याची कमाअी'– अुमाकांत भेंडे यांच्या निरनिराळ्या लेखांचा हा संग्रह आहे. लेखकाने यांत भावरेखा आणि व्यक्तिरेखा असे दोन विभाग पाडले आहेत. त्यांत व्यक्तिरेखांमधून सरहद्द गांधी, वि. घाटे, माडखोल्कर अित्यादि प्रसिद्ध, आणि अर्जुनराव हे अप्रसिद्ध गृहस्थ आले आहेत. रामा गडी व फॅमिली डॉक्टर यांमध्ये कोणी अेकच विशिष्ट व्यक्ति वर्णिली नसून त्या वर्गातील सर्वसामान्य माणसें आलीं आहेत. 'भावरेखा' या पूर्वार्धांत मात्र अनेक विषय दिसतात. खादाडपणा, विक्षिप्तपणा, अेकेकाचा स्वभाव म्हणून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील माणसांचे स्वभाव, घरोघरचीं दुःखें, आवडतीं सुंदर स्थळें, गाड्यांतील गमती त्यांत पाहावयास मिळतात.

या लेखनाचें स्वरूप ललित लघुनिबंधांचें आहे. लेखक धंद्याच्या निमित्ताने सर्व देशभर फिरत असल्याने नानाविध अनुभव त्याला आले आहेत. त्या अनुभवांच्या वेळीं सहृदय आणि रसिक दृष्टि लेखकाने ठेवली असल्याने त्याला स्वतःला होणारा आनंद अितरांसहि देण्याचा त्याचा प्रयत्न आहे. मनुष्यस्वभावाचें लेखकाचें ज्ञानहि मार्मिक आहे. म्हणजे लेखक होण्यास आवश्यक साधनसंपत्ति भेंडे यांच्याजवळ आहे. लघुनिबंधास जुळणारी खेळकर वृत्तीहि त्यांच्या ठिकाणीं दिसते. यामुळे प्रस्तुत लेखन मनोरंजक झालें आहे. भाषा किंवा तन्त्र यांवर अधिक प्रभुत्व असणाऱ्या लेखकाच्या हातीं हेच विषय अधिक आकर्षक व कलापूर्ण झाले असते असें म्हणतां आलें तरी आजहि हे लेख मनोरंजन आणि अुद्बोधन या दोन्ही दृष्टींनी वाचनीय झाले आहेत.

"त्रिलिंग देशांतील दैनंदिनी"– तैलंगणाचा परिचय करून देणारे नअू लेख यामध्ये लेखकाने ग्रथित केले आहेत. प्रथम तेलुगु वाङ्मयाचा परिचय करून देअून मग तेथील शिल्प, लोकगीतें, भातशेती व तडाग यांनी पूर्ण असा निसर्ग, अेक लोककथा, अेका आधुनिक वसंतसेनेचें चरित्र, व अेका परदेशी पण तेथे स्थाअिक झालेल्या अरबाचें जीवन यांचें सुरस वर्णन लेखकाने पुढील लेखांतून केलें आहे. लेखकाची दृष्टि काव्यमय आहे, शैलीहि तशीच आहे. त्यामुळे देशपरिचयाच्या या ग्रंथास रूक्षता मुळींच न येतां तो मोठा मनोरंजक झाला आहे. हे लेख आणखी मोठे व संख्येने अधिक असते तर फार चांगलें झालें असतें असें वाटतें. नीरस प्रवासवर्णनें देण्यापेक्षा अेखाद्या देशाचा परिचय करून देण्याची प्रस्तुत पद्धति फार चांगली असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. या पद्धतीचें आणखी लेखन श्री. कृष्णाकुमार यांच्याकडून व्हावें अशी अपेक्षा वाचकाच्या मनांत खास अुत्पन्न होते. हें सारें लेखन अथपासून अितिपर्यंत मुद्रणशैथिल्याने भरलें असल्याने मात्र वाचकाचा सारखा विरस होत राहतो हें नमूद केल्याशिवाय राहवत नाही.

रा. श्री. जोग

अनुक्रमणिका

**शिक्षणशास्त्र—**

**प्राथमिक शाळेंत मराठी भाषा कशी शिकवावी ?** ले. वा. दा. गोखले, अेम्. अे., बी. टी., व्हाअिस प्रिन्सिपल, गांधी ट्रेनिंग कॉलेज, पुणें.

'अधीतिबोधाचरणप्रचारणैः' या चार प्रकारांनी गांधी ट्रेनिंग कॉलेजांतील नवशिक्या विद्यार्थ्यांस मार्गदर्शन करीत असतां श्री. वा. दा. गोखले यांनी 'भाषाध्यापना'चे जे प्रयोग केले त्यांचें फल म्हणजेच प्रस्तुतचा ग्रंथ होय. त्यांत 'भाषाशिक्षणाचीं मूलतत्त्वें' यांचा मानसशास्त्रीय दृष्टीने विचार केला असून गद्य-पद्य-व्याकरणाचें अध्यापन आणि प्रबंधनादि अंगोपांगांचेंहि विवेचन सहृदयतेने व जिव्हाळ्याने केलें आहे. 'मूल भाषा कशी शिकतें' हें प्रकरण तर शिक्षकांनीच काय पण ज्यांना ज्यांना मुलें आहेत त्या त्या सर्वांनी अेकवार वाचण्यासारखें वठलें असून स्वानुभवाशीं पडताळून पाहण्यासारखें आहे. पुस्तकाच्या शेवटीं १६ नमुन्याचे पाठ टाचणांसह दिले आहेत, त्यामुळे पुस्तकाच्या अुपयुक्ततेंत बहुमोलाची मर पडली आहे. लेखी कामासंबंधी श्री. गोखले यांनी केलेल्या सूचना पुष्कळांना अभिनव वाटतील. सारांश, हें पुस्तक ट्रेनिंग घेत असलेल्या होतकरू विद्यार्थ्यांना अंगुलिनिर्देश करणाऱ्या फलकाप्रमाणे योग्य व अचूक मार्ग दाखवीलच, पण ट्रेनिंग घेतलेल्या अशा प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांनीहि तें वाचलें तर त्यांनाहि आपण थोडें तरी 'नवीन' वाचलें असें वाटल्यावाचून राहणार नाही खास.

**नीळकंठ शंकर नवरे**

---

## बृहन्महाराष्ट्रीय साहित्यवार्ता

**अिंदूर—**

ऑक्टोबरमध्ये रा. भाकोडे यांचें 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटी' व रा. य. खं. कुळकर्णी यांचें 'भारतीय नृत्यकला' या विषयावर सप्रयोग व्याख्यान झालें. डिसेंबरमध्ये दिवंगत ठळक मराठी कवींचा स्मृतिदिनसप्ताह साजरा करण्यांत आला. त्यांत केशवसुतपूर्व मराठी कवींपासून तर केशवसुतोत्तर टिळक, गडकरी, बालकवि, विनायक, घाटे, चंद्रशेखर अित्यादि कवींवर व्याख्यानें झालीं. शेवटचें व्याख्यान तांबे कवींच्यावर झालें. समारोप शेवटच्या दिवसाचे अध्यक्ष रा. रहाळकर यांनी केला. जानेवारींत ता. १५।१६ व ता. २३।२४ या दिवशीं खिश्चन कॉलेज व होळकर कॉलेज येथील मराठी मंडळांचे वार्षिक दिन अनुक्रमें राजकवि यशवंत व प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने साजरे झाले. होळकर कॉलेजांत शेठ कैन्हय्यालाल भंडारी यांनी मंडळास अुदार देणगी दिली व त्यामुळे प्रमुख मराठी साहित्यिकांच्या छायाचित्रांचा लाभ होळकर कॉलेजांतील मराठी मंडळास झाला. मराठी वर्गांत हीं चित्रें ठेवण्यांत येतील. ता. १२ दिवशीं होळकर कॉलेज मराठी नाट्यमंडळाने प्रा. गो. के. भट यांच्या पारितोषिक मिळालेल्या 'गृहदाह' नाटकाचा प्रयोग मोठ्या

यशस्वितेने करून दाखविलें. नाटकास खूपच रसिक अुपस्थित होते. ता. २३ ला प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांचें साहित्यसभेंत 'गेल्या दहा वर्षांतील अितिहाससंशोधन' या विषयावर व्याख्यान झालें. रा. रा. म. आठवले यांचें 'सत्तावनी क्रांतियुद्ध' या विषयावर लागोपाठ दोन दिवस व्याख्यान झालें. मार्च २५-२६ या दिवशीं साहित्यसभेचा 'गृहप्रवेशादिनोत्सव' साजरा करण्यांत आला. अेप्रिल ता. ९ रोजीं अिंदूरचे सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. सी. सरवटे यांच्या षष्ट्यब्दिपूर्तिनिमित्त त्यांना साहित्यसभेकडून मानपत्र देण्यांत आलें.

अिंदूरहून या वर्षी १२ विद्यार्थी साहित्य-परिषदेच्या परीक्षांस बसले होते. त्यांतून अुत्तीर्ण झाले. प्रवेशपरीक्षेतील सर्व विद्यार्थी दुसऱ्या वर्गांत आले.

आग्रा विद्यापीठांत मराठी हा विषय अेम्. अे. ला घेण्याची आजपर्यंत सोय नव्हती परंतु या वर्षी विद्यापीठाने हा विषय अेम्. अे. साठी मान्य केला आहे. अिंदूर साहित्यसभेचे शिष्टमंडळाने शिक्षणमंत्र्यांची भेट घेअून होळकर कॉलेजने अेम्. अे. मराठी वर्ग सुरू करावेत अशी मागणी केली आहे.सरदार श्रीमंत मा. वि. किबे यांनी याविषयी फार पूर्वी येथील विधिमंडळांत ठराव आणला होता. त्याची परिपूर्तता होअील अशी फार आशा दिसत आहे.

म. अ. करंदीकर

---

# मराठवाड्यांतील साहित्यवार्ता

**मराठी मंडळ—** कै. हरिभाअू आपटे यांची पुण्यस्मृति प्रा. नांदापूरकर यांच्या अध्यक्षतेखाली जाहीर रीतीने साजरी करण्यांत आली. अनायासें आपटे चरित्रकार कु. वेणुताअी पानसे अुर्फ सौ. निर्मलाबाअी हर्पे यांचेंहि आगमन झाल्यांने कार्यक्रम चांगला झाला.

**संदर्भग्रंथसंग्रहयोजना—** मंडळाच्या अभ्यासशाखेसाठी संदर्भग्रंथांचा संग्रह हाताशीं असावा लागतो. श्रीमान् वासुदेवराव नाअीक यांनी आपले पूज्यवर कै. वडील बंधु गोविंदराव नाअीक यांच्या स्मरणार्थ २०० रु. चे संदर्भग्रंथ अेका कपाटासुद्धा दिले त्याचा अुद्घाटनसमारंभ श्रीमान् बॅ. श्रीधरराव नाअीक यांच्या हस्तें करण्यांत आला. या संग्रहांत 'मराठवाडा' म्हणून अेक स्वतंत्र विभागहि ठेवण्यांत आला आहे.

**बालहनुमानसंघ—** गेल्या नाथषष्ठीच्या निमित्ताने मराठीच्या तरुण आणि अुत्साही अभ्यासकांचें छोटेखानी संमेलन भरून गटवारी अभ्यासविषय आणि योजना आंखण्यांत आल्या. श्री. भगवानराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली श्री. पोहनेरकर यांच्या अुद्घाटनपर भाषणाने कार्यास प्रारंभ झाला. साहित्यांतील वेगवेगळ्या दृष्टिकोणांतून नाथवाङ्मयावर प्रकाश टाकण्यांत आला आणि शेवटीं 'साहित्यिक अेकनाथ' हा श्री. पोहनेरकरांचा पोवाडा त्यांनी गाअून दाखविला व कार्यक्रम संपला.

संघाच्या महिलाशाखेकडून कविवर्य गिरीश यांचें काव्यगायन झालें.

संघाच्या ध्रुवप्रकाशन शाखेकडून 'मंदार' नांवाचा लघुकथासंग्रह प्रकाशित करण्यांत आला. श्री. दिगंबरराव बिन्दु हायकोर्ट वकील यांच्या हस्तें हा समारंभ झाला. विवेकवाचन-म. सा. प. (१७-२-८)

मंदिर शाळेच्या साहाय्यार्थ संघाच्या महिला शाखेकडून खास स्त्रियांसाठी 'नव्या वाटा' या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला.

विनोदमंडळ— मंडळाच्या साहित्यशाखेकडून वर्तुळवाचनालयांत शिशुवाचन-विभाग श्रीमंत बालराजा जितेंद्रकुमार नेमिवंत यांच्या हस्तें अुघडण्यांत आला.

मराठीसंघ, अुस्मानिया विद्यापीठ— संघाचें वार्षिक स्नेहसंमेलन श्री. कवि गिरीश अुर्फ प्रा. शं. के. कानेटकर यांचें काव्यगायन आणि व्याख्यान यांनी यशस्वीरीत्या पार पडलें.

मराठीसंघ, निजाम कॉलेज— श्री. न्या. मू. श्रीपतरावजी पळणिटकर यांच्या अध्यक्षतेखाली संघाचें वार्षिक स्नेहसंमेलन झालें. श्री. र. मु. जोशी, अेम्. अे., यांचें श्रवणीय व्याख्यान आणि 'अुद्याचा संसार' या नाटकाचा प्रयोगहि करण्यांत आला.

हैदराबादेंत मराठी नाट्य-शतसांवत्सरिक अुत्सवाची कार्ययोजना करण्याची गडबड चालू असून निवडलेले जनतेचे प्रतिनिधि आणि सहकारी संस्था यांच्यांतून लवकरच कार्यकारी मंडळाची निवडणूकहि होअील. चालू वातावरणावरून हा अुत्सव बऱ्याच मोठ्या प्रमाणांत गाजेल अशी जनता अपेक्षा करिते.

न. शे. पोहनेरकर

---

## भाषाभगिनींचा साहित्यसंसार

**गुजराती—**

ललितवाङ्मयामध्ये काव्यविभागांत कविश्रेष्ठ न्हानालाल यांचे अेम्. अेम्. त्रिपाठी यांनी प्रसिद्ध केलेले दोन काव्यग्रंथ अुल्लेखनीय आहेत. 'कुरुक्षेत्र' हें अेक महाकाव्य असून 'जगत्प्रेरणा' हें अेक नाट्यकाव्य आहे. 'साधना' या नांवाचा श्री. मोगीलाल गांधी यांचा कवितासंग्रहहि निर्देशिण्याजोगा आहे. 'वसंतविलास' या अेका जुन्या पण अति महत्त्वाच्या काव्याचें संपादन आणि अर्वाचीन अनुवादहि (श्री. रजनीकांत भटकृत) या तिमाहींत झालेला आहे. कादंबरी विभागांत चुनीलाल यांची 'मरमरेखा' ही अैतिहासिक कादंबरी, अुमाकान्त यांची 'नर्तकी' ही सामाजिक कादंबरी, मोगीन्द्र दिवेटिया यांच्या 'चमेली अने प्रतिमा' या दोन लघुकादंबऱ्या, 'हसहसाट' ही विनोदी कथा (श्री. जोशी) अित्यादि ग्रंथ डोळ्यांपुढे येतात. 'रणांगण' या मराठी कादंबरीचा अनुवादहि श्री. गोविंदराव भागवत यांनी केला आहे. नाटकांत पं. मेहता यांचें 'सीता' नाटक व लघुकथांत श्री. बेकार यांचा 'हास्य-मंझील' हीं दोन पुस्तकें येतात.

चरित्रग्रंथांत श्री. कनैयालाल मुनशींच्या 'सीधां चढाण' या आत्मचरित्राचा दुसरा भाग अुल्लेखावयास हवा. झवेरचंद मेघाणी यांचें 'दयानंद सरस्वती' यांचें चरित्र आणि श्री. धूमकेतु यांचें 'वीर वनराज' हीं चरित्रेंहि तशींच निर्दिष्ट होण्याजोगीं आहेत.

साहित्यशास्त्रविषयक लेखनहि लक्षांत घेण्याजोगें झालें आहे. प्रा. विजयराय वैद्य यांचें 'गुजराती साहित्यनी रूपरेखा', श्री. कनैयालाल मुनशी यांचें 'आदिवचनो' भाग २ रा (व्याख्यानसंग्रह), प्रा. नवलराय त्रिवेदी यांचें 'कलापी'वरील पुस्तक आणि कै. के. ह. ध्रुव यांचा 'प'कार कोप हे ग्रंथ त्यांत येतात.

ना. ग. जोशी

**कन्नड—**

श्री. च. वासुदेवय्या, कानडी साहित्याचे भीष्माचार्य, गेल्या डिसेंबरच्या अखेरीस वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी दिवंगत झाले. म्हैसूरमधील गद्याचा आदिग्रंथ 'बालबोध', त्याच-प्रमाणे 'आर्यकीर्ति' आणि 'भीष्मचरित' या ग्रंथांचे ते लेखक होत. अर्वाचीन कन्नड गद्याच्या जनकांपैकी ते अेक असून साहित्यिक म्हणून लोक त्यांना फार मान देत.

बंगलूर येथील सेंट्रल कॉलेजच्या कर्नाटक संघाचा रौप्यमहोत्सव मोठ्या थाटाने आणि अुत्साहाने साजरा झाला. अर्वाचीन कन्नडमधील अेक प्रथितयश लेखक श्री. गुंडाप्पा हे अध्यक्ष होते. 'कन्नडिगांचें कन्नड' या विषयावर त्यांनी अेक विचारपरिप्लुत व विचारप्रवर्तक असें भाषण केलें. समर्थ अशा लेखकांकडून निरनिराळ्या विषयांवर ग्रंथ लिहवून तें वाङ्मय लोकांपर्यंत पोचविण्याची आवश्यकता त्यांनी प्रतिपादिली. त्याच वेळीं कन्नड साहित्यपरिषदेचे अेक संस्थापक कै. श्री. वेंकटनारायणप्पा यांच्या चित्राचें अनावरण करण्यांत आलें.

कन्नडमधील कादंबरीकार आणि अेक प्रमुख कथालेखक श्री. कृष्णराव यांनी विजापूर, धारवाड व दक्षिण कारवार या जिल्ह्यांतून परिषद्प्रचारार्थ दौरा काढला होता. त्या वेळीं प्रगतिशील साहित्याविषयी त्यांनी बरींच व्याख्यानें दिलीं. पुरोगामी साहित्यसंस्थेमार्फत गॉर्कीचा अेक ग्रंथ प्रकाशित करण्याची योजना झाली आहे.

कन्नड-कन्नड-कोश शास्त्रीय पद्धतीने तयार करण्यासाठी प्रा. अे. आर. कृष्णशास्त्री (अध्यक्ष) व श्री. टी. अेन्. श्रीकंठय्या (चिटणीस) असणारी अेक समिति नेमण्यांत आली आहे. तामिळ, तेलुगू व मराठी या जवळच्या भाषांमधील विद्वानांचें साहाय्य अपेक्षिलें जात आहे. प्रा. बी. अेम्. श्रीकंठय्या यांची अेकसष्टी ९-२-४४ ला परिषद्कार्यालयांत साजरी झाली. त्या वेळीं श्री. द. रा. बेंद्रे हे अध्यक्ष होते.

मुंबअी कर्नाटक संघाने अेक वसंतव्याख्यानमाला अेप्रिलमध्ये घडवून आणली. दर आदितवारीं कर्नाटक अेकीकरणावर निरनिराळ्या वक्त्यांचीं व्याख्यानें झालीं. पहिलें व्याख्यान श्री. बेंद्रे यांचें झालें. त्या वेळीं कन्नडसाहित्यसेवेबद्दल त्यांचा सत्कार करण्यांत आला.

र. श्री. मुगळी

---

## गेल्या तिमाहीमधील मराठीचा साहित्यसंसार

**(१) साहित्यचर्चा—**

(१) ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचीं साधनें—ले. न. चिं. केळकर सह्याद्री, फेब्रु. १९४४
(२) ज्ञानेश्वरी मूळशोधन— ले. गो. कृ. मोडक ,, मार्च ,,
(३) गोविंदांचें तनुकांतिगीत— ले. का. र. वैशंपायन ,, अेप्रिल ,,
(४) गडकऱ्यांची कल्पकता— वि. ह. कुलकर्णी समीक्षक मार्च ,,
(५) गडकऱ्यांच्या नाटकांतील विचारप्रवाह—ले. स. वि. देशपांडे, समीक्षक मार्च ,,
(६) सामान्य माणसें व अभिरुचि— ले. रा. झोळ समीक्षक अेप्रिल ,,
(७) घरांतील गाणीं— ले. वि. कृ. नेरूरकर स्त्री ,, ,,
(८) केशवसुतांचें तत्त्वज्ञान— ले. रा. श्री. जोग अभिरुचि ,, ,,
(९) वाङ्मयांतील वास्तवता— ले. ललितकुमारी भट मनोहर फे. ,,

(१०) लोकवाङ्मय– ले. श्री. ज. जोशी मनोहर मार्च १९४४
(११) कविसंमेलन आणि कवितावाचन– ले. म. श्री. पंडित ,, फे. ,,
(१२) अश्लीलता– ले. शांताराम सबनीस अभिरुचि मार्च ,,

(२) साहित्यिकांचे परिचय—
(१) कुमुदबांधव– ले. रा. द. ब्रह्मे मनोहर अेप्रिल ,,
(२) म. श्री. पंडित– ले. रा. अ. काळेले ,, फे. ,,
(३) वा. म. जोशी यांचा जीवनसंदेश– ले. ना. म. पटवर्धन अभिरुचि मार्च ,,

(३) अध्यक्षीय भाषणें—
(१) प्र. के. अत्रे– बडोदें वाङ्मय परिषद्, बडोदें
(२) न. चिं. केळकर– नाट्यशताब्दमहोत्सव, पुणें
(३) मा. वि. वरेरकर– नाट्यशताब्दमहोत्सव, ग्वाल्हेर

(४) अुल्लेखनीय प्रकाशन—
(१) नाट्यचर्चा (नाट्यविषयक लेखसंग्रह)– प्र. डॉ. खिरवडकर, ग्वाल्हेर
(२) गृहदाह (नाटक)– ले. गो. के. भट
(३) तांबडी माती– ले. बा. सी. मर्ढेकर (कादंबरी)
(४) यशोगिरि– ले. कवि यशवंत (कवितासंग्रह)
(५) पाकिस्तानची छाया– आय्. सी. शेख.
(६) अैतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय अितिहास– ले. य. न. केळकर

---

## संपादकीय

नाटक व रंगभूमी

गेल्या नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत सुरू झालेलें नाट्यविषयक शतसांवत्सरिक महोत्सवांचें चक्र संपूर्ण झालें नसलें, तरी जवळ जवळ अखेरीला आलें आहे. या अुत्सवाच्या अगदी आरंभालाच अपघाताचा अपशकुन होअूनहि ठिकठिकाणच्या अुत्सवांत कांही अुणें पडलें असें झालें नाहीं ही मोठी समाधानाची बाब आहे. जनतेच्या अितक्या मोठ्या अुत्साहाचा पाठिंबा दुसऱ्या कोणत्याहि साहित्यविषयक अथवा कलाविषयक अुत्सवाला मिळाला नसेल. प्रसिद्ध नटांचे संयुक्त नाट्यप्रयोग, लोकनाट्य, नाट्याचा जो अगदी जुना अर्थ तें नर्तन, अध्यक्षीय भाषणें व शेवटीं नाट्यविषयक थोडी चर्चा या क्रमानें अुतरत्या लोकप्रियतेच्या कार्यक्रमांनी हे अुत्सव गजबजून गेले होते. 'नाटक हें झुंडीकरिता असतें' या प्रसिद्ध वचनांत कांही कुत्सितार्थ नसेल, तर तें तसें आहे हें पुनः अेकदा सिद्ध झालें असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. हे सर्व अुत्सव आर्थिक दृष्ट्या कोणाहि चालक मंडळींस पश्चात्ताप करावयास लावणारे झाले नाहीत ही सर्वांत स्पृहणीय गोष्ट होय.

* * *

या निमित्तानें नाट्यविषयक अैतिहासिक किंवा तात्त्विक विवेचनात्मक लेखन बरेंच होणार आहे अशी अपेक्षा निर्माण झाली होती. परंतु अपेक्षेच्या मानानें तें अत्यल्प झालें आहे असें म्हणणें अपरिहार्य आहे. अेक डॉ. लेले यांचा जुन्या नाट्याविषयीचा ग्रंथ, आणि दुसरा ग्वाल्हेर येथें प्रसिद्ध केलेला 'नाट्यचर्चा' या नांवाचा तात्त्विक विवेचनात्मक ग्रंथ

अनुक्रमणिका



याखेरीज याप्रकारचें भरीव असें लेखन झालें नाही ही गोष्ट कांही लपवितां येत नाही. हें लेखन करणें हें अुत्सव साजरे करण्यापेक्षा अधिक अवघड कदाचित् नसलें, तरी कालावधीचें काम आहे हें सर्वांनाच मान्य होअील. तेव्हा या निमित्ताने आरंभिलेलें हें वाङ्मयकार्य जरी आजच शेवटास जाअून अुपलब्ध झालेलें नसलें तरी लवकरच होअील अशी आशा करण्यापलीकडे सध्या दुसरें कांही करणें शक्य नाही.

* * *

या नाट्यमहोत्सवांतून नाट्यवाङ्मयापेक्षा रंगभूमीचा अुद्धार या प्रश्नाकडेच अधिक लक्ष दिलें जावें हें साहजिकच होतें. नाटक वाचण्यापेक्षा नाटक पाहणें ही गोष्टच 'जनसंमर्दा'ला आवडणारी असल्याने त्याच्या दृष्टीने नाट्यवाङ्मयापेक्षा रंगभूमीचें भवितव्य अधिक महत्त्वाचें ठरतें. त्या रंगभूमीचें भवितव्य सुरक्षित राखण्याकरिता जी जी अुपाययोजना करावयाची असेल ती ती अवश्य व्हावयास हवी. पण ती करीत असतां कांही गैरसमज दूर ठेवले तर बरें होअील. स्त्रियांनी रंगभूमीवर कामें करावयास हवीं, रंगभूमीची सजावट अगदी अद्ययावत् आणि वास्तव अशी असावयास पाहिजे, नाट्याचें जुनें तंत्र सोडून नव्या तंत्राचा स्वीकार करावयास हवा, विनोदाशिवाय नाटक यशस्वी होअू शकणार नाही, तत्कालीन सामाजिक प्रश्नांबाबत विचार त्यांत झाला पाहिजे अित्यादि समजुती या प्रकारच्या आहेत. हें सारें किंवा बरेंचसें व्हावयास हवें यांत शंका नाही. पण यांतील कोणतेंहि अेक किंवा सर्व मिळून रंगभूमीचा खरा अुद्धार करावयास असमर्थ आहेत. रंगभूमीचा खरा आत्मा म्हणजे नाट्यकला किंवा अभिनयकला, तिच्या अभिवृद्ध्यर्थ किंवा संपादनाप्रीत्यर्थ जेवढे श्रम व्हावयास हवेत तेवढे करण्याची कल्पना किंवा तयारी कोठे दिसत नाही. नाट्यकलेंतील जिवंतपणा हालचाल करणाऱ्या माणसांत नसून अभिनयसामर्थ्यांत आहे. अद्ययावत् सजावट, नवीन नाट्यतंत्र, स्वरूपसुंदरता, संगीतकुशलता, बेफाम विनोद किंवा अनिरुद्ध प्रचार यांपैकी अेकाचेंहि साहाय्य फारसें नसतांना महाराष्ट्र नाटकमंडळी रंगभूमीवर बराच काल गाजली याचें कारण अभिनयप्रावीण्य होय. वरील गोष्टी हव्यात, असायला हरकत नाही; पण पहिलें महत्त्व अभिनयाला आहे, त्यांना नाही.

* * *

बोलपटांची स्पर्धा रंगभूमीला बरीचशी घातक झाली ही गोष्ट नाकबूल करण्याचा अट्टाहास किंत्येकांकडून होतो. नाट्य ही जिवंत कला आहे; बोलपटकला तशी नाही, ही गोष्ट खरी. पण अेवढ्यावर विसंबून चालणार नाही. नाट्यकलेचा जिवंतपणा खरोखर अभिनयसामर्थ्यांत आहे; आणि तें व माणसांची हालचाल या दोनहि गोष्टी बोलपटास, पटावर का होअिना, आणतां येतात. वाटेल त्या प्रकारची पार्श्वभूमि आणि सजावट बोलपटास शक्य आहे. वाटेल ते प्रसंग दाखविणें छायाचित्रकलेच्या हातचलाखीने व अितर साधनसंपत्तीने शक्य झालें आहे. कोणाहि पात्रास गोड गळा व संगीतकुशलता प्राप्त करून देणें तंत्रप्रगतीमुळे सुलभ होअून बसलें आहे. विनोद, प्रचार या गोष्टीहि नाटकाअितक्या तरी अनुकूल आहेत. थोड्या वेळांत, थोडक्या पैशांत लोकांची भरपूर करमणूक करण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. मग केवळ अेकीकडे जिवंत पात्रें पाहावयास मिळतात, दुसरीकडे त्यांच्या छायामय प्रतिकृति तेवढ्या दिसतात अेवढ्या तात्त्विक भेदावर रंगभूमीला बोलपटापासून खरा धोका नाही असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ? आज युद्धजन्य परिस्थितीमुळे बोलपटनिर्मितीवर फार नियंत्रण बसलें आहे, अेवढ्यामुळे रंगभूमीकडे प्रेक्षक धाव घेअूं लागला असला तरी

त्यामुळे त्यांची लोकप्रियता कमी झाली असें म्हणतां येत नाही. युद्धोत्तर ही स्पर्धा पुनः सुरू होओील अिकडे दुर्लक्ष्य करण्यांत फायदा नाही.

* * *

बोलपटांपेक्षां रंगभूमीचें खरें आधिक्य नाटकांच्या वाङ्मयगुणांत आहे. वाङ्मय म्हणून बोलपटांची किंवा त्यांमधील संवादांची फारशी मातब्बरी असूं शकत नाही. कोणत्याहि बोलपटांच्या संवादाचें पुस्तक वाङ्मयनिविष्ट झालेलें नाही. अभिनयाच्या बरोबरीचें रंगभूमीच्या अुद्धाराचें दुसरें मोठें कारण म्हणजे अुत्कृष्ट नाटकवाङ्मयनिर्मिति हेंच होय. पण रंगभूमीच्या अवनतीनें सर्वांत अधिक परिणाम कशावर झाला असेल तर तो नवीन नाटकवाङ्मयनिर्मितीवर होय. नाटकाचें खरें सौभाग्य तें रंगभूमीवर येण्यांत आहे असें सर्व लेखकांना वाटत असतें. आणि तें खरें आहे. पण रंगभूमीच जेथे ठिकाणावर नाही, म्हणजे नाटक करावयास नाट्यगृह नाही, व करून दाखवायला कंपनी नाही, तेथे नाटक लिहाच कशाला असें लेखकांस वाटतें यांत शंका नाही. नवीन नाटकें नाहीत म्हणून कंपन्याहि चालत नाहीत. अशी परस्परघातक स्थिति आज प्राप्त झाली आहे. तिचें पर्यवसान साहित्याच्या दृष्टीने नाटकवाङ्मयनिर्मितीच्या अभावांत झालें आहे.

* * *

साहित्यिकांचें याबाबत कर्तव्य हें की नाटक रंगभूमीवर आलें तरच तें आपण लिहूं ही वृत्ति त्यांनी धरतां कामा नये. काव्य, कादंबरी या अितर वाङ्मयप्रकारांप्रमाणेच आत्माविष्काराचा हा अेक वाङ्मयप्रकार आहे या दृष्टीनेच त्याच्याकडे पाहून तें वाचलें गेलें व रसिकांकडून त्याचें स्वागत झालें म्हणजे पुष्कळ झालें अेवढयाच अपेक्षेने तें लिहिलें जावें. दृश्य असें स्वरूप त्याला आलें तर ठीकच, पण निदान तें वाचलें जाओील अेवढी अपेक्षा जरूर बाळगावी. त्यांत प्रयोगक्षमता अवश्य हवी, परंतु तें रंगभूमीवर येओील अशी आगाअू हमी घेअून मगच लिहावयास घेओीन ही वृत्ति नसावी. प्रयोगक्षमता आणि खरा नाट्यगुण असलेलें नाटक केव्हा ना केव्हा रंगभूमीवर आल्यावाचून राहणार नाही. तें कदाचित् न आलें तरी नाटकसाहित्यांत चांगली भर पडली असें तरी होओील.

* * *

अुलट नाटकमंडळ्यांचें कर्तव्य असें की आपल्या ठराविक नाटककारांकडून आपल्या मनास येओील असें नाटक लिहून घेअून तेंच रंगभूमीवर आणावयाचें ही पद्धति त्यांनी सोडून दिली पाहिजे. आज नाटकें नाटकमंडळ्यांकरिता लिहिलीं जातात. नाटकाकरिता नाटकमंडळी नाही. अेखाद्या कंपनींत असणाऱ्या नटांच्या अभिनयसामर्थ्यास जुळेल व झेपेल अशा प्रकारचेंच नाटकाचें स्वरूप असावें असें नाटककारावर बंधन पडलें की तें नाटक कसें होत असेल याची कल्पना सहज करतां येते. स्वतंत्र नाटकनिर्मितीवर याचा परिणाम झाला व परिणामीं हें नाटक कंपन्यांनाच घातक झालें. नवीन नवीन चांगलीं नाटकेंच येओीनाशीं झालीं. साहित्यिकांना आणि नाटक मंडळ्यांना रंगभूमीच्या उद्धाराची खरोखरच तळमळ असेल तर प्रयोगनिरपेक्ष अशी अुत्कृष्ट नाटकनिर्मिति करून व अशा नाटकांची वशिल्याशिवाय निवड करून आपल्यामध्ये असलेल्या अभिनयसामर्थ्याची पराकाष्ठा करून त्यांनी ती तळमळ खरी असल्याचें दाखवून द्यावें. याअुपरहि रंगभूमीस भरभराटीचें दिवस आले नाहीत तर तिचें नशीब असेंच म्हणावयास हवें.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## १९४३ चें अितिवृत्त

म. सा. परिषदेच्या १९४३ या वर्षांतील कार्याचें अितिवृत्त सादर करतांना कार्यकारी मंडळास आनंद होत आहे.

अि. स. १९४२ अखेर म. सा. परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकी पुन्या होअून खालील अधिकारी निवडून आले.

अध्यक्ष— प्रा. वामन मल्हार जोशी. अुपाध्यक्ष— महामहोपाध्याय पांडुरंग वामन काणे, मुंबअी; प्रा. दत्तो वामन पोतदार, पुणें; श्री. नारायण गोविंद चापेकर, बदलापूर; श्रीमंत माधवराव विनायक किबे, अिंदूर; श्री. भास्करराव विठोजीराव जाधव, मुंबअी. कार्याध्यक्ष— रा. सा. र. लु. जोशी, पुणें. खजिनदार— प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, पुणें. कार्यकारी मंडळ— श्री. विठ्ठल दत्तात्रेय घाटे, पुणें; श्री. के. नारायण काळे, पुणें; श्री. कृष्णाजी गणेश लिमये, पुणें; डॉ. अमृत नारायण भालेराव, मुंबअी; प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग, पुणें; प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी, नागपूर; प्रा. वासुदेव दामोदर गोखले, पुणें; डॉ. नरहर काशिनाथ घारपुरे, पुणें.

अध्यक्ष, अुपाध्यक्ष, कार्याध्यक्ष व खजिनदार या जागांच्या निवडणुकी बिनविरोध झाल्या. अुपाध्यक्षांच्या जागीं वरील पांच विद्वान निवडून आले. कार्यकारी मंडळाच्या सदस्यांची निवडणूक नियामक मंडळाच्या सदस्यांकडून होत असते. त्याप्रमाणे त्याहि जागीं वरील सदस्य निवडून आले.

कार्यकारी मंडळाच्या पहिल्या सभेंत कार्यकारी मंडळाचे सदस्य म्हणून प्रा. श्री. रा. पारसनीस व श्री. गं. भा. निरंतर यांस स्वीकृत करण्यांत आलें.

वरीलप्रमाणे कार्यकारी मंडळ पूर्ण झाल्यानंतर ता. ९ जानेवारी दिवशीं भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत प्रा. वासुदेव दामोदर गोखले व श्री. के. नारायण काळे यांची चिटणीस म्हणून व प्रा. रा. श्री. जोग यांची महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक म्हणून निवड झाली.

या निवडणुकीनंतर नवीन चिटणिसांनी दप्तर ताब्यांत घेअून काम पाहण्यास आरंभ केला. पहिल्या तिमाहींत कार्याध्यक्ष रा. सा. र. लु. जोशी यांनी आपला राजीनामा सादर केल्याने अेक मोठी आपत्तीच कार्यकारी मंडळावर आली. परिषदेचे सतत सहा वर्षें चिटणीस म्हणून रावसाहेब जोशी यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक, आस्थेने, तन्मयतेने काम केलें होतें व त्यांच्या या अनुभवाचा फायदा कार्याध्यक्ष म्हणून परिषदेस मिळेल असा भरवसा कार्यकारी मंडळाने धरला होता. रावसाहेबांनी आपला राजीनामा परत घ्यावा याबद्दल खुद्द परिषदेच्या अध्यक्षांनी त्यांस अेक दोन वेळां विनंतीपत्रें लिहिलीं. परंतु त्याचा अुपयोग झाला नाही. ता. ३ ऑक्टोबर दिवशीं भरलेल्या नियामक मंडळाच्या सभेंत हा राजीनामा खेदपूर्वक स्वीकारण्यांत आला.

परिषदेचे नूतनाध्यक्ष मान्यवर साहित्यिकाग्रणी प्रा. वामन मल्हार जोशी यांच्या निधनाने (ता. २०।७।४३) तर परिषदेची फारच मोठी हानि झाली आहे. कै. वामनरावजींनी गेलीं सहा वर्षें

अनुक्रमणिका

परिषदेचे कार्याध्यक्षत्वाची धुरा सांभाळली होती. तत्पूर्वीहि अनेक वर्षे ते परिषदेचे अुपाध्यक्ष होते. परिषदेच्या प्रथम श्रेणीच्या कार्यकर्त्यांत त्यांची गणना होत असे व त्यांच्या सल्लामसलतीचा अुपयोग परिषदेस सर्वदा होत असे. त्यांच्या मुंबअी येथील स्मशानयात्रेस परिषदेचे चिटणीस प्रा. वा. दा. गोखले, नियामक मंडळाचे सदस्य प्रा. गं. बा. सरदार व श्री. बापूराव नाअीक अित्यादि मंडळी पुण्याहून मुद्दाम गेली होती.

कै. वामनरावजी जोशी यांच्या निधनाने व रा. सा. र. लु. जोशी यांच्या राजीनाम्याने अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांच्या रिकाम्या झालेल्या जागा भरण्यासाठी नियामक मंडळाची सभा ता. ३ ऑक्टोबर दिवशी भरविण्यांत आली. अध्यक्षपदीं सुप्रसिद्ध वाङ्मयेतिहाससंशोधक प्रा. दत्तो वामन पोतदार यांची निवड झाली. प्रा. पोतदार यांचा व परिषदेचा संबंध तिच्या स्थापने-पासून असून परिषदेच्या ज्येष्ठ कार्यकर्त्यांत ते अग्रेसर आहेत.

कार्याध्यक्षपदीं श्री. कृष्णाजी गणेश लिमये यांची योजना सभेने सर्वानुमतें केली. श्री. काकासाहेब लिमये हे गेलीं सहा वर्षे परिषदेच्या कार्यकारी मंडळांत आहेत.

श्री. कृ.ग.लिमये यांची योजना कार्याध्यक्षपदीं झाल्याने त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागीं कार्यकारी मंडळाने सौ. आनंदीबाअी शिर्के यांची योजना केली.

अुपाध्यक्षपदीं असलेले बहुतेक विद्वान् कित्येक वर्षे परिषदेशीं संबद्ध असून त्यांतील कांहींनी तर अध्यक्ष-कार्याध्यक्ष या पदावर अधिष्ठित होअून परिषदेची प्रतिष्ठा वाढविली आहे. याहि विद्वानांचें सहकार्य परिषदेस मिळत राहील असा कार्यकारी मंडळास भरवसा वाटतो.

वर्षारंभीं पटावरील समासदांची संख्या ८५९ अेवढी होती. या वर्षी राजीनाम्यामुळे ३२, थकबाकीमुळे ४४, अेकूण ७६ नांवें कमी करावीं लागलीं. मृत्यूमुळे पुढील १० सभासद गळाले— १ श्रीमंत नारायणराव घोरपडे (आश्रयदाते), २ प्रा. वा. म. जोशी (तह.), ३ दि. ब. कृ. ल. पावणसकर (तह.), ४ रा. ब. वा. अ. बांबर्डेकर, ५ डॉ. वि. स. सुख-ठणकर, ६ श्री. वि. पां. नेने, ७ श्री. द. वि. आपटे, ८ मुं. ब. द. भि. रानडे, ९ डॉ. ल. जा. कोकर्डेकर, १० श्री. नां. म. बाके.

या वर्षी साधारण समासदांच्या यादींत नवीन १२३ समासदांची भर पडली. तसेंच तहहयात ३२, हितचिंतक ४, साहाय्यक ३ व आश्रयदाते १ याप्रमाणे अेकूण १६३ सभासद अधिक मिळाले. मात्र यांतील कांही सभासद वर्गबदलीने त्यावरील सभासदवर्गात समाविष्ट झाले असल्याने संख्येंत अधिक भर अेकूण १४७ चीच पडली. १९४३ या वर्ष-अखेर पटावर खालीलप्रमाणे सभासद होते— अुपकर्ते १, आश्रयदाते ३, साहाय्यक ३, हितचिंतक १९, तहहयात २०९, साधारण ६८५ अेकूण ९२०. बाकीदार सभासद १५८.

या वर्षी वाङ्मय-सेवा-मंडळ, धुळें, या संस्थेस परिषदेशीं संलग्न करून घेण्यांत आलें.

देणग्या— पटवर्धन स्मारक समितीने यंदा अेकूण रु. ३६०० देणगीदाखल दिले. सामान्य खर्चासाठी पुणें नगरपालिकेने रु. १०० व अिमारतखर्चासाठी श्री. रा. ना. वळे यांनी रु. ५० याप्रमाणे परिषदेस देणगी दिली.

**आर्थिक परिस्थिति**— या अहवालास जोडलेला जमाखर्चाचा तक्ता, पडताळा व ताळेबंद यावरून परिषदेची आर्थिक परिस्थिति सभासदांस कळून येअील.

तक्ता १ यांतील आय व व्यय पाहतां दिसून येअील की चालू सालीं जमेपेक्षा खर्च अेकूण रु. ३०९-६-० ने अधिक झाला आहे. परिषदेच्या खर्चास ट्रस्टींकडील व्याजाची

रकम जी अंदाजपत्रकांत समाविष्ट केली होती ती जमा होअू शकली नाही. कांही खात्यांत अनपेक्षित वाढ झाली. अुदाहरणार्थ, परीक्षाशुल्क या खात्यांत यंदा रु. ९०४-८-९ जास्त रकम झाली. तसेंच कचेरींतील रद्दी विकली त्याचेहि रु. ६६९-४-० जमा झाले. खर्चाच्या बाबींतील अंदाजापेक्षा कांही खात्यांत अधिक खर्च झाला. परिषदेच्या अितिहास छपाअीवर अंदाजापेक्षा ३०२-८-० अेवढा अधिक खर्च झाला. परीक्षांस अपेक्षेपेक्षा जास्त अुमेदवार बसल्याने छपाअी, केंद्रें अित्यादींवर अधिक १७५ रुपयांवर खर्च झाला. कोणत्या खात्यांत कमी अगर जास्त जमा अगर खर्च झाला हें जमाखर्चाशीं पडताळा या तक्त्यांत (तक्ता २) समासदांस पाहावयास मिळेल.

(तक्ता ३) १९४३ च्या ताळेबंदावरून अेकंदर देणें-घेणें याविषयी व अिदर्गीतील वाढ–घसारा याविषयी समासदांस माहिती होअील. गतवर्षांचें अिमारतीवरील ठेकेदाराकडील सर्व कर्ज फिटलें आहे. तसेंच डिबेंचर्सरूपाने १९४२ मधील रु. ९२०० व १९४३ मधील रु. ५०० मिळून रु. ९७०० या रकमेमधून रु. ३००० ची कर्जफेड झाली असून अद्याप रु. ६७०० ची कर्जफेड व्हावयाची आहे. माधवराव पटवर्धन स्मारक समितीने यंदा अेकूण रु. ३६०० ची देणगी दिली. तसेंच अिमारतनिधीसाठी श्री. श्री. ना. बळे यांनी रु. ५० ची देणगी दिली. खालील गृहस्थ प्रत्येकीं रु. ५० देअून परिषदेचे तहहयात सभासद झाले:—

१ श्री. दिनानाथ बळवंत वसिष्ठ, मुंबअी; २ सौ. अिंदुमतीराजे राजवाडे, सांगली; ३ श्री. यशवंत आबाजी भट, कलकत्ता; ४ प्रा. प्रभाकर वासुदेव बापट, लष्कर–ग्वाल्हेर.

वरील सर्व साहाय्यकांचें कार्यकारी मंडळ ऋणी आहे.

**घटनेंतील अुद्देश व तदनुसार झालेलें कार्य**— परिषदेच्या घटनेंत नमूद केल्याप्रमाणे 'मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणें, अुपाय योजणें व अितर रीतीने झटणें आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें' हे परिषदेचे प्रधान अुद्देश आहेत. व हे अुद्देश सिद्धीस जाण्याकरिता कोणत्या साधनांचा अुपयोग करावा हेंहि दिग्दर्शित केलें आहे (पाहा घटना पृ. १, परि. ३.). परिषदेकडून या वर्षी कोणकोणत्या साधनांच्या द्वारा परिषदेचे वरील अुद्देश अल्पांशाने सिद्धीस नेण्याचा प्रयत्न झाला हें खालील वृत्तान्तावरून कळून येअील :—

(अ) या पोटकलमांत निर्देश केल्याप्रमाणे अखिल महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २७ वें अधिवेशन सांगली येथे श्री. श्रीपाद महादेव माटे यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यांत आलें. या संमेलनाने अेकूण १२ ठराव मान्य केले व त्यांची अंमलबजावणी करण्याचें काम शक्यतों चालू आहे.

नाशिक येथील गत साहित्य संमेलनाच्या अधिकृत छापील वृत्तांताचें प्रसिद्धीकरण याच संमेलनप्रसंगीं झालें.

(आ) या पोटकलमांत निर्देशिल्याप्रमाणे धुळें येथील वाङ्मयसेवामंडळ ही संस्था परिषदेशीं संलग्न करून घेण्यांत आली.

मध्यप्रांत शाखा सभा, नागपूर, दाक्षिणी संस्थान साहित्य सभा, सांगली, व सोलापूर साहित्य समिति, सोलापूर, या शाखासभांचीं कामें चालू आहेत. फक्त सोलापूर शाखेचेंच वृत्त प्रसिद्धीसाठी आल्याने तें या अितिवृत्तास जोडलें आहे.

(अि) हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष पं. माखनलाल चतुर्वेदी हे पुण्यास आले असतांना त्यांस परिषदेंत मुद्दाम पाचारण करून त्यांचा सत्कार केला. सवडीप्रमाणे महाराष्ट्र साहित्य परिषदेचें मंदिर व अितर कार्य पंडितजींच्या निदर्शनास आणण्यांत आलीं. हिंदी साहित्य संमेलनाने हिंदी भाषा, साहित्य अित्यादीविषयी जें कार्य केलें त्याबद्दलची माहिती पंडितजींनी सांगितली. परिषदेचे अध्यक्ष प्रा. दत्तो वामन पोतदार यांनी परिषदेच्या कार्याविषयी माहिती सांगून आर्थिक अडचणींमुळे परिषद् मोठें कार्य करूं शकली नसल्याचें सांगितलें. मात्र या प्रसंगाने परिषदेस अद्याप किती पल्ला गांठावयाचा आहे हें पुन्हा अेकदा स्पष्ट झालें.

अन्य भाषांच्या साहित्यसंस्थांशीं व साहित्यविषयक चळवळींशीं अवश्य व शक्य असेल तेथे सहकार्य करणें असा अेक अुद्देश आहे. त्यास अनुसरून 'भाषाभगिनींचा संसार' या सदराखाली माहिती देण्याचा प्रयत्न म. सा. पत्रिकेंतून संपादकांनी केला आहे.

(अी व अु) या पोटकलमांत निर्दिष्ट केल्याप्रमाणे परिषदेने यंदा खालील दोन अुपक्रम विशेषत्वाने केले.

(अि) या कलमांत निर्दिष्ट केलेल्या विषयावर जरी परिषदेस प्रत्यक्ष ग्रंथनिर्मिति करतां आली नाही तरी 'अितिहास' या विषयावर अेक वाङ्मयसंमेलन ता. १ व २ जून दिवशीं रा. ब. गोविंद सखाराम सरदेसाअी यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यांत आलें. संमेलनांत (१) अितिहास व ललितवाङ्मय, (२) अितिहास व शैक्षणिक अभ्यासक्रम, (३) अितिहास व लोकशिक्षण या विषयांवर चर्चा झाली. पहिल्या विषयावर श्री. न. चिं. केळकर, श्री. रा. म. आठवले, श्री. के. ना. काळे अित्यादींचीं, दुसऱ्या विषयावर श्री. वि. द. घाटे, श्री. वि. पां. बोकील, प्रा. रा. वि. ओतूरकर अित्यादींचीं व तिसऱ्या विषयावर प्रा. द. वा. पोतदार, प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, डॉ. शं. दा. पेंडसे, श्री. शं. दा. चितळे यांचीं चर्चात्मक भाषणें झालीं. या विषयांवर ५० लेखकांस आपले विचार मांडण्याबद्दल विनंती करण्यांत आली होती, व तीस अनुसरून कांहींनी आपले लेख पाठविलेहि होते.

(अु) या कलमान्वयें विज्ञानशास्त्राचें व तदनुसार सामाजिक व साहित्यिक विचारप्रवाहांचें ज्ञान मराठी वाचकांना सुलभ करून देण्याकरिता चर्चा घडवून आणण्याचें कार्य परिषदेवर सोपविलें आहे. याच्या सिद्ध्यर्थ अेका व्याख्यानसत्राचीच योजना परिषदेने केली असून त्यांतील पहिली व्याख्यानमाला हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, अेम्.अे., अेम्.लिट्., पुणें, यांनी ता. २८, २९, ३० ऑगस्ट दिवशीं गुंफिली. व्याख्यानांचे विषय 'युद्ध्यमान राष्ट्रांचा फडणिशी व्यवहार', 'चलनवृद्धि व तिचे परिणाम', 'युद्धकालीन आर्थिक धोरण' हे होते. व्याख्यानांस नाममात्र शुल्क ठेविलें होतें. व तें देअून प्रत्येक व्याख्यानास १२५-१५० अभ्यासक अुपस्थित होत असत.

मराठी व्याकरणासंबंधी विचार-चर्चा करण्याकरिता नेमलेल्या व्याकरणसमितीचेंहि काम चालू असून समितीच्या सभा कार्यालयांत भरत असतात.

(अू) याबाबत परिषदेचें परिभाषा मंडळ कार्य करीत आहे. त्यांनी या वर्षी केलेल्या कार्यांचें वृत्त या वृत्तास जोडलें आहे.

(अे) याबाबत महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंतून साहित्य प्रसिद्ध होत असतें.

**परीक्षा—** प्राज्ञ व विशारद या परीक्षांशिवाय प्रथमा व प्रवेश या नवीन परीक्षा या वर्षापासून परिषदेतर्फे घेण्यांत येत गेल्या. यंदा अेकूण १४ केंद्रांतून सर्व परीक्षांस मिळून ६२३ अुमेदवार परीक्षेस बसले. परीक्षा पुढील केंद्रीं घेण्याची व्यवस्था झाली :— संकेश्वर, पंढरपूर, सोलापूर, पुणें, मुंबअी, नागपूर, अिंदूर, हैदराबाद (द.), जळगांव, नगर, औरंगाबाद, सातारा, आंबेजोगाअी, बेळगांव, तासगांव, नांदेड, सायन (मुंबअी), चिकोडी, सांगली, सेलू, अमरावती, खिर्डी, परभणी, हिंगोली. केंद्राधिकारी म्हणून सर्व तऱ्हेचें साहाय्य पुढील सद्गृहस्थांनी आपुलकीने दिलें:– प्रा. वा. मा. दबडघाव, कु. पिरोजबाअी आनंदकर, श्री. कृ. ना. पिले, श्री. नेने, श्री. नां. मा. सन्त, प्रि. रा. स. जोशी, श्री. पु. ना. वीरकर, श्री. मराठे, श्री. डी. अेस. नाअीक, श्री. वासुदेवराव हर्डीकर, श्री. न. दा. वाघ, श्री. भी. म. खेडगीकर, श्री. वि. गो. कर्वे, श्री. अनंत मालेराव, श्री. मनुमाअी देसाअी, श्री. प. प. पटवर्धन, श्री. ना. दि. पंडित, श्री. अे. बी. पाठक, हेडमास्तर, सायन अिंग्लिश स्कूल, श्री. म. रं. भटजी, श्री. वि.ह.आपटे, प्रा.पारनंदीवार, मुख्याध्यापक, रामचंद्र धोंडो हायस्कूल, चिकोडी, श्री. श्री.रा.डोअीफोडे. पुढील गृहस्थांनी परीक्षकाचें काम करून परिषदेस अुपकृत केलें:– श्री. न. शे. पोहनेरकर, श्री. र. वि. हेरवाडकर, श्री. द. रा. कानेगांवकर, श्री. श्री. र. भिडे, श्री. रा. ना. झोळ, श्री. अ. स. गंधे, श्री. ना. मा. संत, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. वा.दा. गोखले, श्री. नी. शं. नवरे, श्री. ह. ना. नेने, डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, प्रा. य. र. आगाशे, श्री. श्री. म. वर्दे, प्रा. श्री. रा. पारसनीस, श्री. गं. बा. सरदार, प्रा. द. के. केळकर, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. रा. श्री. जोग, श्री. गं. भा. निरंतर, प्रा. अ. म. जोशी.

अुमेदवारांच्या शिक्षणासाठी प्रतिवर्षाप्रमाणे वर्ग चालविण्यांत आले. या कामीं पुढील अध्यापकांचें साहाय्य झालें:– (१) प्रा. वा. दा. गोखले, (२) श्री. गं. भा. निरंतर, (३) प्रा. गं. बा. सरदार, (४) श्री. द. रा. कानेगांवकर, (५) श्री. म. ना. अद्वंत, (६) श्री. श्री. र. भिडे, (७) श्री. पंडित, (८) श्री. ह. श्री. शेणोलीकर (९) श्री. य. वि. जोशी, (१०) श्री. रा. ना. झोळ.

वरील सर्व साहाय्यकांचें कार्यकारी मंडळ अत्यंत आभारी आहे.

परीक्षांची योजना व त्यांचा प्रसार व्हावा या हेतूने परिषदेचे अेक चिटणीस प्रा.वा.दा. गोखले यांचीं सांगली व पापडी येथील ट्रेनिंग कॉलेजांत व्याख्यानें झालीं.

**म. सा. परिषदेचें प्रकाशन–** प्रा. द. वा. पोतदार यांजकडून लिहवून घेतलेल्या म. सा. परिषदेच्या अितिहासाचें प्रकाशन रा. ब. गो. स. सरदेसाअी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या वाङ्मयसंमेलनप्रसंगीं ता. २ जून दिवशीं करण्यांत आलें.

**स्वाध्याय मंडळ–** प्राज्ञ व विशारद या परीक्षांच्या अभ्यासकांस वाङ्मय, भाषा, कला अित्यादि विषयक सर्वसामान्य माहिती होअून त्यांचा बौद्धिक दर्जा वाढावा या हेतूने या मंडळाची यंदा मुद्दाम घटना करण्यांत आली. या मंडळाच्या वतीने खालील विद्वानांचीं जीं व्याख्यानें करविण्यांत आलीं तीं खालीलप्रमाणेः—

| दिवस | विषय | व्याख्याते |
|---|---|---|
| फेब्रुवारी | रत्नागिरी व नाशिक संमेलनाध्यक्षांचीं भाषणें. | श्री. श्री. के. क्षीरसागर<br>,, गो. ग. तळवलकर |



| | | |
|---|---|---|
| ३ जुलै | कला व सामाजिक जीवन. | श्री. के. नारायण काळे |
| (अकूण ८ व्याख्यानें) | टीकाशास्त्र व वाङ्मयीन मूल्यें. | प्रा. रामचंद्र शंकर वाळिंबे |
| २९ ऑगस्ट | अर्वाचीन कानडी काव्य; काव्यगायन. | ,, दत्तोपंत बेंद्रे |
| २५ सप्टेंबर } २ आक्टोबर } | कलानिर्मितीची प्रक्रिया. | श्री. के. नारायण काळे |

खालील स्मृतिदिन पाळण्यांत आले—

| | वक्ते | अध्यक्ष |
|---|---|---|
| डॉ. रवीन्द्रनाथ टागोर | श्री. के. ना. काळे | रा.ब. म. का. कारखानीस |
| ,, श्री. व्यं. केतकर | ,, तळवलकर, श्री. निरंतर अि. | प्रा. द. वा. पोतदार |
| कै. शिवराम महादेव परांजपे | ,, शि. ल. करंदीकर | |
| ,, भास्कर रामचंद्र तांबे | ,, श्री. के. क्षीरसागर<br>,, तळवळकर, निरंतर | प्रा. रा. श्री. जोग |

**संकीर्ण**– औंधचे श्रीमंत राजे बाळासाहेब पंडित पंत प्रतिनिधि व सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर ह्यांनी माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरास भेट देअून व या मंदिरांत होत असलेल्या कार्याची माहिती घेअून समाधान व्यक्त केलें.

परिषदेचे अध्यक्ष प्रा. वामनराव जोशी यांचा ६१ वा वाढदिवस जाहीररीत्या गोखले स्मारक मंदिरांत श्री. पु. मं. लाड यांच्या अध्यक्षतेखाली परिषदेच्या वतीने व अितर वाङ्मयीन संस्थांच्या सहकार्याने साजरा केला. या प्रसंगानंतर कै. वामनरावजींचा मृत्यु केवळ थोड्याच महिन्यांनी घडून आला. त्याबद्दलची शोकसभा गु. अण्णासाहेब कर्वे यांच्या अध्यक्षतेखाली टिळक स्मारक मंदिरांत परिषदेच्या पुढाकाराने भरविण्यांत आली.

माधवराव पटवर्धन स्मारकदिनानिमित्त कोपरगांव येथील श्रीमंत शेट बापूराव बोरावके यांच्या हस्ते सुप्रसिद्ध चित्रकार श्री. नी. म. केळकर यांनी काढलेल्या कै. माधवराव पटवर्धनांच्या तैलचित्राचें अनावरण ता. ५ डिसेंबर दिवशीं करण्यांत आलें. या प्रसंगीं प्रा. रा. श्री. जोग यांचें 'माधव ज्यूलियन यांची कविता व तिचा आधुनिक कवितेवर झालेला परिणाम' या विषयावर भाषण झालें.

परिषदेच्या 'माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरा'चा अुपयोग अनेक साहित्यसंस्था अगर वाङ्मयविषयक कार्यें यांस होतो हें खालील वृत्तावरून समजण्यासारखें आहे.

गोविंदाग्रज स्मृतिदिन मंडळातर्फे गोविंदाग्रजस्मृतिदिन डॉ. कमलाबाअी देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. श्री महाराष्ट्र शारदा मंदिराचें वार्षिक साहित्यसंमेलन म. म. पांडुरंग वामन काणे यांच्या अध्यक्षतेखाली या मंदिरांतच भरविण्यांत आलें. लाहोरचे सुप्रसिद्ध विद्वान डॉ. रघुवीर हे पुण्यास आले असतांना पुण्यांतील ३०-४० विद्वान मंडळींशीं परिभाषाविषयक चर्चा झाली. या सभेसाठी पटवर्धन मंदिर हेंच स्थान योजिलें होतें.

———

अनुक्रमणिका

## जानेवारी ते अेप्रिल १९४४ मधील कार्य

वरील वार्षिक वृत्तान्तावरून १९४३ अिसवी मधील परिषदेचें कार्य समासदांस कळून अेअील. परंतु जानेवारी-अेप्रिल १९४४ या चार महिन्यांतील कांही अुल्लेखनीय कार्यांबद्दल-ची माहिती समासदांस मिळावी या हेतूने खालील माहिती समासदांस पुरवण्यांत येत आहे.

**व्याख्यानसत्र–** परिषदेने सुरू केलेल्या व्याख्यानसत्रांतील दुसरी माला पुणें येथील संस्कृत पंडित विद्यानिधि श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी गुंफिली. व्याख्यानाचा विषय 'अुच्चारशास्त्र' हा होता. हा विषय शास्त्रीबुवांनी 'अुच्चारशास्त्राचा परिचय', 'वर्ण-मालेची पाहणी' व 'मराठींतील अुच्चारविशेष' या तीन व्याख्यानांत अनुक्रमें ता. ८, ९, १० जानेवारी रोजीं मांडला. व्याख्यानांस नाममात्र शुल्क देअून सुमारें ७५-१०० अभ्यासक अुपस्थित होते. टिळक कॉलेज ऑफ अेज्युकेशन व ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन यांमधील विद्यार्थिवर्ग व नू. म. वि. हायस्कूलमधील शिक्षकवर्ग या व्याख्यानांस अुपस्थित असल्याचें प्रामुख्याने दिसत होतें.

**शाखासभा–** या चार महिन्यांत परिषदेचे अेक चिटणीस श्री. के. नारायण काळे यांनी सातारा, बेळगांव, अहमदनगर येथे प्रचार करून शाखासभा स्थापन करण्याचा प्रयत्न केला आहे. सातारा येथील शाखासभा बहुतेक स्थापन झाल्यासारखीच आहे. बेळगांव व अहमदनगर येथील शाखासभा पुढील महिन्यांत स्थापन होतील.

**संकीर्ण–** पुणें येथील टिळक कॉलेज ऑफ अेज्युकेशन या संस्थेतील विद्यार्थि-शिक्षक-वर्गांनी व या कॉलेजचे प्रमुख प्रि. म. शं. गोडबोले यांनी परिषदेच्या विनंतीवरून परिषदेस भेट दिली. परिषदेच्या चिटणीस-कार्याध्यक्षांनी येथे होत असलेल्या कामाची माहिती देअून, विशेषतः परिषदेच्या परीक्षाबाबत कांही सूचना असल्यास त्या करण्याबद्दल विनंती केली. प्रा. गोडबोले यांनी परीक्षा या केवळ स्मरणशक्तीचे जेणेंकरून प्रयोग न होतील अशा तऱ्हेचें परीक्षांचें स्वरूप ठेवण्याचा परिषदेने प्रयत्न करावा अशी सूचना केली.

**माधवराव पटवर्धन स्मारक समिति देणगी–** मा.प.स्मारकसमितीकडून १९४४ च्या मार्च महिन्यांत देणगीदाखल रु. ३२०० मिळाले. या देणगीबद्दल परिषद् समितीची ऋणी आहे.

पुणें येथील सुप्रसिद्ध अॅक्चुअरी श्री. ग. स. मराठे यांनी परिषदेकडे अिमारतीसाठी कर्जाअू म्हणून रु. ५०० जी रकम ठेविली होती ती त्यांनी आता परिषदेस देणगी म्हणून दिली आहे. श्री. बाबासाहेब-मराठ्यांच्या या साहाय्याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे.

**अिमारत कर्ज–** या चार महिन्यांत अिमारतीवरील कर्जाचा बोजा रु. ३७०० ने कमी झाला असून आता या कर्जापैकी फक्त रु. ३००० परत करावयाचे अुरले आहेत.

---

## परिभाषाचर्चामंडळ

### १९४३ सालचें अितिवृत्त

(१) अहवालाच्या वर्षी मंडळाच्या अेकंदर सोळा सभा झाल्या. त्यांची विषयवारी अशी– १ डॉ. सहस्रबुद्धे यांच्या 'सूक्ष्म सृष्टि' या पुस्तकांतील परिभाषेवर चर्चा; १३ मुद्रण-विषयक परिभाषा; ३ मानसशास्त्रविषयक परिभाषा.

'मुद्रण'विषयक परिभाषा बरीचशी तयार झाली आहे, तथापि अहवालाच्या वर्षी ती पुरी झालेली नाही; पुढील वर्षीहि कार्य चालू राहावयाचें आहे. मानसशास्त्रविषयक परिभाषा ठरविण्यासाठीं तीन बैठकी झाल्या. त्यांत शिक्षणविषयक मानसशास्त्रांचा विचार प्रथम करावा असें ठरून अेतद्विषयक परिभाषा बनवितांना स्वीकारावयाच्या कांहीं सामान्य धोरणाची रूपरेखा चर्चिली गेली.

(२) लाहोर येथील विद्वान कोशकर्ते डॉ. रघुवीर यांनी अेका स्वतंत्र सभेत आपण तयार करीत असलेल्या परिभाषाकोशाची योजना आणि स्वीकारलेली परिभाषापद्धति समजावून सांगितली.

त्र्यं. गो. ढवळे
कार्यवाह, प. च. मंडळ

---

## म. सा. परिषद्— सोलापूर शाखा

### सन १९४३ चा वार्षिक अहवाल

सन १९४३ चा वार्षिक अहवाल सादर करतांना कार्यकारी मंडळास पुढील कार्याबद्दल विशेष समाधान वाटत आहेः— १ तहहयात सभासदांच्या संख्येंत वाढ. २ सोलापुरांत विशेष प्रमाणांत साजरा झालेला म. नाट्य शतसांवत्सरिक अुत्सव.

या वर्षी परिषदेच्या शाखेतर्फे 'अंतर्वीणा' या टंकलिखित काव्यग्रंथाचें प्रकाशन, साहित्यसम्राट् न. चिं. केळकर यांचे हस्तें केलें गेलें. या पुस्तकामध्ये स्थानिक अुदयोन्मुख कवींनी आपली सोलापुरांत लोकप्रिय झालेलीं काव्यें ग्रथित केलीं आहेत. 'अंतर्वीणा' प्रकाशनातर्फे लवकरच अेक निबंध व टीकालेखसंग्रह टंकलिखित पद्धतीने प्रसिद्ध होणार आहे.

चालू वर्षीचे फेब्रुवारीमध्ये निजाम राज्यांत 'हिप्परगें' गांवीं तेथील खाजगी शाळेचे अुत्सवाप्रीत्यर्थ बरेच प्रथितयश साहित्यिक गेले होते. त्यांपैकी श्री. वि. स. खांडेकर, राजकवि यशवंत, प्रा. वा. म. जोशी व श्री. शंकरराव किर्लोस्कर यांना शाखेने खास आमंत्रण दिलें व त्यांचीं अेथील ह. दे. हायस्कूलमधील मुळे हॉलमध्यें अुद्बोधक भाषणें झालीं. कै. वा. म. जोशी यांचें हें सोलापुरांतील शेवटचेंच भाषण ठरलें. मुळे हॉल हा शहरापासून दूर असतांनाहि या व्याख्यानाला स्त्रीपुरुषांची अलोट गर्दी लोटली होती.

कविवर्य टेंमुर्णीकर व महाराष्ट्र साहित्यपरिषदेस सर्वस्वीं वाहून घेतलेले प्रा. वामनराव जोशी यांच्या शोचनीय निधनाबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले.

चालू वर्षी परिषदेसाठीं तहहयात सभासद मिळवण्याचा प्रयत्न पूर्वी सोलापुरांत असलेले सोलापूर म्युनिसिपालिटीचे अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर व हल्ली पुणें म्युनिसिपालिटींत त्याच हुद्यावर काम करीत असलेले श्री. टी. पी. अत्तरदे यांच्या चिकाटीच्या प्रोत्साहनाने करण्यांत आला व पुढील सद्गृहस्थ ५० रुपये देणगी देअून तहहयात सभासद झाले. १ श्री. वि. मों. साठे, २ श्री. बाबुराव नरसप्पा जक्कल, ३ श्री. शंकर नीलकंठ जामदार, ४ श्री. अनंत काशिनाथ जोशी, ५ श्री. शंकर गोविंद पटवर्धन, ६ श्री. के. व्हो. केळकर, ७ श्री. अिरण्णा पिराजी अुपलप, ८ डॉ. मालचंद्रराव मुळे.

येथील शाखेचे अेक अुत्साही चिटणीस श्री. द. ब. मुद्गल यांची येथून अहवालाचे सालीं औरंगाबादेस बदली झाल्यामुळे संस्था त्यांच्या सहकार्यास मुकली आहे. शाखेच्या कार्यास त्यांनी केलेल्या मदतीबद्दल संस्था त्यांची सदैव ऋणी राहील.

आरंभीं अुल्लेखिल्याप्रमाणे चालू वर्षाच्या अुत्तरार्धात महाराष्ट्र नाट्य शतसांवत्सरिक अुत्सव मोठ्या प्रमाणांत साजरा करण्यांत आला. या कार्याचा अहवाल खाली देणेंत येत आहे.

## म. नाट्यशताब्दमहोत्सवाचे कार्यक्रम

चालू वर्षी महाराष्ट्र नाट्यशताब्द महोत्सव साजरा होणार असल्यामुळे सोलापुरांतहि त्यासंबंधी कार्यक्रम करण्याचें ठरविण्यांत आलें आणि नट, नाटककार व साहित्यिक यांचीं नाट्यविषयक पांच व्याख्यानें करण्याचा संकल्प करण्यांत आला.

याप्रमाणें पहिलें पुष्प नटसम्राट् बालगंधर्व यांच्या व्याख्यानाने ता. ५।८।४३ रोजीं गुंफण्यांत आलें. याच वेळीं गंधर्व कंपनींतील जुने नट श्री. आठवले, रा. मांडारकर, रा. वालावलकर वगैरेंनी आपले नाट्यविषयक अनुभव श्रोत्यांस सांगितले. या प्रसंगीं गंधर्व नाटक मंडळीस तीस वर्षे पुरीं झाल्याबद्दल श्री. बालगंधर्वांचा गौरव करण्यांत आला. गंधर्व कंपनीचे श्री. नेवरेकर यांनीहि या कार्यक्रमांत भाग घेतला.

महाराष्ट्रांतील सुविद्य नटी सौ. जोत्स्ना मोळे यांचें दुसरें व्याख्यान ता. १९।८।४३ रोजीं झालें. या कार्यक्रमांत नाट्यनिकेतनचे श्री. मोहिते, नकलाकार पंडित, सरोज बोरकर, छोटा गंधर्व श्री. सौदागर, श्री. जोशी, श्री. कुंटे वगैरे नटनटींनीहि भाग घेतला.

मुंबअीचे विनोदी लेखक श्री. फाटक यांचे अध्यक्षतेखाली सुप्रसिद्ध नट श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांचें व्याख्यान हा या मालेंतील तिसरा कार्यक्रम होय. श्री. कोल्हटकर यांचें व्याख्यान माहितीपूर्ण व सुश्राव्य झालें. श्री. चिंतामणराव यांचे अध्यक्षतेखाली सोलापूर साहित्य समितीने पुरस्कृत केलेल्या व स्थानिक नटवर्गाने रंगभूमीवर आणलेल्या मानबंधन नाटकाचा प्रयोगहि याच दिवशीं रात्रीं अत्यंत थाटामाटांत पार पडला.

## शेवटचा व्याख्यानांचा कार्यक्रम

प्रथितयश साहित्यिक श्री. वि. स. अुर्फ भाअूसाहेब खांडेकर व महाराष्ट्र सिनेमासृष्टींतील लोकप्रिय नट–दिग्दर्शक रा. विनायकराव कर्नाटकी यांच्या नाट्यविषयक जोडव्याख्यानाने साजरा करण्यांत आला.

शताब्द-महोत्सव समितीच्या सूचनेप्रमाणे स्थानिक नाटककाराने लिहिलेलें व स्थानिक नटनटींनी रंगभूमीवर आणलेलें नाटकाचा कार्यक्रमहि समितीच्या तर्फे साजरा करण्यांत आला. श्री. शेटजाळे यांचें संगीत मीठमाकर नाटक पसंत करण्यांत येअून या नाटकाचा प्रथम प्रयोग अक्कलकोट संस्थानचे लोकप्रिय दिवाणसाहेब कॅ० गुलाबराव देशमूख यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ३१।१०।४३ रोजीं करण्यांत आला. या खेळाचे अुत्पन्नापैकी खर्च वजा जाता राहिलेलें अुत्पन्न बंगाल फंडास देण्याचें साहित्य समितीने ठरविलें आहे.

तक्ता नं. १

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

### जमाखर्च १९४३

**जमा**

| | | |
|---|---|---|
| १६३५–०–० | साधारण समासद वर्गणी– | |
| | १९४३ | १५६२–०–० |
| | १९४४ | ७३–०–० |
| | | १६३५–०–० |
| १३१–०–० | पत्रिका वर्गणी— | |
| | अि.स.१९४३ | १२६-८-० |
| | ,, १९४४ | ४-८-० |
| | | १३१–०–० |
| ६१-१२-० | संलग्न संस्था वर्गणी | |
| | अि.स.१९४३ | ५५-१२-० |
| | ,, १९४४ | ६–०–० |
| | | ६१-१२-० |
| २०–०–० | जाहिरात | |
| २००४–८–९ | परीक्षाशुल्क अित्यादि | |
| १००–०–० | नगरपालिका देणगी | |
| १४९–०–० | पटवर्धन साहित्य मंदिर माडें | |
| ३८–५–० | व्याख्यानसत्र शुल्क | |
| ६६९–४–० | कचेरींतील रद्दी | |
| १४६-१३-६ | ग्रंथविक्री | |
| १८-१०-६ | व्याज | |
| ३०९–६–० | तूट | |
| ५२८३-११-९ | अेकूण | |

**खर्च**

| | | |
|---|---|---|
| १३६५-१०-६ | कचेरी खर्च | |
| | पगार | ९६५-१२-० |
| | प्रॉव्हिडंट फंड | ४६–४–० |
| | महागाअी भत्ता | ६३–०–० |
| | सादिल | ३६–०–० |
| | वीज | ४८-१३-० |
| | म्युनिसि. कर | ६५-११-० |
| | बट्टा | ३–२–० |
| | किरकोळ छपाअी | २१–२–० |
| | मुईमाडें | १५–०–० |
| | लिखाअी | ६–८–० |
| | कार्या. टपाल | ९४–६–६ |
| | | १३६५-१०-६ |
| १८४०-१०-० | पत्रिका खर्च | |
| | छपाअी | १६२९-१४-० |
| | टपाल व किर. | २१०-१२-० |
| | | १८४०–१०–० |
| १४६-११-६ | संकीर्ण | |
| | अुपाहार | ५३–९–६ |
| | किरकोळ | ९३–२–० |
| | | १४६-११-६ |
| १९–५–० | प्रवास प्रचार | |
| १०–०–० | अुपसमित्या | |
| ६५२–८–० | म. सा. परिषद् अितिहास | |
| ७२-१३-६ | वाङ्मयसंमेलन | |
| ३६८–०–० | अिमारत कर्जव्याज | |
| २-१४-० | किरकोळ सामान | |
| ५६–०–० | अिमारतदुरुस्ती | |
| १०४–५–९ | संमेलनखर्च | |
| ५५५-१३-६ | परीक्षाखर्च | |
| ८९–०–० | शाखा सभा देणगी | |
| ५२८३-११-९ | अेकूण | |

अनुक्रमणिका

**तक्ता नं. २**

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

### अंदापत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा (१९४२)

| अुत्पन्न | अंदाज-पत्रकाप्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर | खर्चबाब | अंदाज-पत्रकाप्रमाणे | प्रत्यक्ष | प्रत्यक्ष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| साधारण सभासद वर्गणी | १८०० | १६३५-०-० | -१६५-०-० | कचेरी खर्च | १४०० | १३६५-१०-६ | - ३४-५-६ |
| पत्रिका वर्गणी | १०० | १३१-०-० | + ३१-०-० | पत्रिका खर्च | १६०० | १८४०-१०-० | +२४०-१०-० |
| संलग्न संस्था वर्गणी | ७५ | ६१-१२-० | - १३-४-० | परीक्षा खर्च | ३८० | ५५५-१३-६ | +१७५-१३-६ |
| परीक्षाशुल्क अित्यादि | ११०० | २००४-८-९ | +९०४-८-९ | म. सा. परिषद् अितिहास | ३५० | ६५२-८-० | +३०२-८-० |
| ग्रंथविक्री | १०० | १४६-१३-६ | + ४६-१३-६ | अिमारत कर्ज व्याज | ३६० | ३६८-०-० | + ८-०-० |
| पटवर्धन साहित्य मंदिर माडें | ३०० | १४९-०-० | -१५१-०-० | संकीर्ण | ६० | १४९-९-६ | + ८९-९-६ |
| पुणें नगरपालिका देणगी | १०० | १००-०-० | ... | संमेलनखर्च | ५० | १०४-५-९ | + ५४-५-९ |
| व्याख्यानसत्रशुल्क | | ३८-५-० | + ३८-५-० | शाखा सभा देणगी | १०० | ८९-०-० | - ११-०-० |
| जाहिरात | | २०-०-० | + २०-०-० | वाङ्मयसंमेलन | ७५ | ७२-१३-६ | - २-२-६ |
| व्याज बँकेकडील | | १८-१०-६ | + १८-१०-६ | अिमारतदुरुस्ती | ५० | ५६-०-० | + ६-०-० |
| कचेरींतील रद्दी | | ६६९-४-० | +६६९-४-० | प्रवास प्रचार | ५० | १९-५-० | - ३०-११-० |
| | | | | अुपसमित्या | ५० | १०-०-० | - ४०-०-० |

तक्ता नं. ४

## महाराष्ट्र साहित्य परिषद्

### अंदाजपत्रक (१९४४)

| जमा | | | खर्च | |
|---|---|---|---|---|
| ८२० | ट्रस्टी व्याज | | १५५६ | कचेरी खर्च |
| | ट्रस्टी व्याज | ७५० | १५७२ | पत्रिका |
| | इचलकरंजी ट्रस्ट | ७० | १४०० | परीक्षा |
| | | ८२० | ५० | प्रवास प्रचार |
| १६०० | साधारण सभासद वर्गणी | | १५० | संकीर्ण |
| १२० | पत्रिका वर्गणी | | २६८ | अिमारत कर्जव्याज |
| ५० | संलग्न संस्था वर्गणी | | ७५ | वाङ्मयसंमेलन |
| ११६ | ग्रंथविक्री | | ५० | अिमारतदुरुस्ती |
| २५०० | परीक्षाशुल्क | | ५० | साहित्यसंमेलन |
| १२० | भाडें | | २५ | अुपसमिति |
| २० | जाहिराती | | १०० | शाखा सभा |
| | | | ५० | संमेलन ठराव अंमलबजावणी |
| ५३४६ | | | ५३४६ | |

अनुक्रमणिका



वक्ता नं. ३

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद् : ताळेबंद १९४३

### निधि व देणें

| | | |
|---|---|---|
| ९५६४-१०-५ | सामान्य निधि | |
| | १९४२ अखेर | ९७८४-०-५ |
| | वजा तूट | ३०९-६-० |
| | | ९५६४-१०-५ |
| ३०६९-०-० | अिमारत निधि देणगी | |
| | १९४२ | ३०१९-०-० |
| | १९४३ | ५०-०-० |
| | | ३०६९-०-० |
| २५०-०-० | तहहयात समासद वर्गणी | |
| | १९४२ | ५०-०-० |
| | १९४३ | २००-०-० |
| | | २५०-०-० |
| १३८९३-४-० | माधवराव पटवर्धन स्मारक समिति देणगी | |
| | १९४२ | १०२९३-०-० |
| | १९४३ | ३६००-०-० |
| | | १३८९३-४-० |
| ६७००-०-० | अिमारत कर्ज | |
| | १९४२ अखेर | ९२०० |
| | १९४३ मधील | ५०० |
| | | ९७०० |
| | वजा १९४३ मधील कर्ज फेड | ३००० |
| | | ६७०० |
| ३४८-५-० | देसवंडीकर प्रॉव्हिडंट फंड | |
| २२-११-० | अनामत | |
| ३३८४७-१४-५ | अेकूण | |

### जिंदगी व येणें

| | | |
|---|---|---|
| २९१६५-९-६ | अिमारत | |
| | १९४२ अखेर | २८९७६-९-६ |
| | १९४३ मधील | १८९-०-० |
| | | २९१६५-९-६ |
| ८४४-८-९ | कार्यालय सामान | |
| | १९४२ अखेर | ६१६-०-९ |
| | १९४३ मधील | २२८-८-० |
| | | ८४४-८-९ |
| ७८-१४-० | ग्रंथ | |
| ६८८-०-० | माधवराव पटवर्धन सा. मंदिर सामान | |
| १३६०-७-३ | ट्रस्टी (तहहयात समासद वर्गणी) | |
| १२७-१५-६ | ट्रस्टी (अिमारत निधि) | |
| ३०-०-० | कारकून | |
| २६-०-० | मुंबअी परीक्षा केंद्र | |
| २०-०-० | प्रा. गं. गो. कानिटकर | |
| ३-०-० | शि. फ. पै आंग्लें | |
| १५०३-७-५ | शिल्लक | |
| | बँक | १४४५-४-७ |
| | चिटणीस | ४९-०-४ |
| | पोस्टाचीं तिकिटें | ९-२-६ |
| | | १५०३-७-५ |
| ३३८४७-१४-५ | अेकूण | |

**हिशेबतपासनिसांचा शेरा—** महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुणें कचेरीचे ता. ३१-१२-१९४३ अखेर पुऱ्या होणाऱ्या वर्षाचे हिशेब मीं तपासले. नेहमींप्रमाणे हिशेब चांगल्या तऱ्हेने ठेविले आहेत. मला पाहिजे असलेली माहिती व खुलासे मला मिळाले. सदरहू जमाखर्च परिषदेच्या पुणें कचेरीच्या देण्याघेण्याची वस्तुस्थिति दाखवीत आहेत. सदर जमाखर्चाबरोबरच परिषदेच्या विश्वस्तांकडील रकमांचे जमाखर्चहि यावयास पाहिजेत. तसे ते मिळण्याबद्दलची व्यवस्था व्हावी. अिमारत व सामान यांवरील घसारा पूर्वीप्रमाणेच चालू सालींहि काढलेला नाही.

पुणें, ता. १६।४।१९४४.

म. वि. गोखले–हिशेबतपासनीस.

अनुक्रमणिका

# परिषद्वार्ता



( चिटणीसांकडून )

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर कार्यकारी मंडळाची सभा दिनांक १४ मे १९४४ दिवशीं भरली. सभेंत खालील कामें झालीं :—

१. (१) 'विजयी मराठा'कार कै. श्रीपतराव शिंदे, (२) व्याकरणकार कै. नारायण विठ्ठल आपटे, (३) प्रि. कै. विनायक गोपाळ गोखले यांजबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले.

२. सातारा विभागाची शाखासभेची घटना मंजूर करण्यासाठी प्रा. रा. श्री. जोग व श्री. के. नारायण काळे यांस कार्यकारी मंडळाचे प्रतिनिधि म्हणून नियुक्त करण्यांत आलें.

**परीक्षा**— 'विशारद' प्रमाणपत्राचा वितरणसमारंभ ता. ४ जून १९४४ दिवशीं करण्याचें ठरलें आहे.

**व्याख्यानसत्र** — हिंदु विद्यापीठांतील विद्वान प्रा. श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर यांचीं व्याख्यानें जून महिन्यांत 'समाजविषयक शास्त्राची रूपरेषा' या विषयावर होतील.

**बेळगांव गटाची शाखासभा-**

परिषदेचे अेक चिटणीस श्री. के. नारायण काळे वरेरकर सत्कार-समारंभासाठी बेळगांव येथे गेले असतां शहापूरचे लोकप्रिय डॉक्टर श्री. गो.वा. हेरेकर यांच्या निमंत्रणाने सुमारे चाळीस पंचेचाळीस प्रमुख साहित्यिक व साहित्यप्रेमी सद्गृहस्थांची सभा तेथील वाङ्मयमंडळाच्या दिवाणखान्यांत ता. ११-४-४४ दिवशीं बेळगांव येथे परिषदेची शाखासभा स्थापन करण्या-बद्दलचा विचार करण्यासाठी भरविण्यांत आली होती. श्री. मामासाहेब वरेरकर हेहि या सभेला अुपस्थित होते. शाखासभेची स्थापना होणें आवश्यक असून तिचें पहिलें कार्य म्हणून प्रांतिक संमेलन भरवावयाची योजना व्हावयाला पाहिजे असें त्यांनी सांगितलें व मे महिन्यांत आपण गोव्याला जाणार आहेंत, तेथून परत येतांना आपण बेळगांव येथे येअून याबाबत चर्चा करूं, असें आश्वासन देअून त्यांना मुंबअीची गाडी पकडण्याची त्वरा असल्यामुळे ते सभेचा निरोप घेअून स्टेशनवर गेले.

यानंतर श्री. काळे यांनी म. सा. परिषदेचें चालू कार्य व जिल्हानिहाय शाखासभा स्थापन होण्याची आवश्यकता याबद्दल सुमारे पाअूण तास भाषण केलें. त्यानंतर थोडी साधक-बाधक चर्चा होअून शाखासभा स्थापन करण्यांत यावी असा प्रस्ताव पसार करण्यांत आला व ती अमलांत आणण्यासाठी पांच सद्गृहस्थांची प्रा. वा. पां. खानोलकर यांच्या नेतृत्वाखाली समिति नेमण्यांत आली. डॉ. हेरेकर, डॉ. बाक्रे, श्री. बॅ. र. सुंठणकर, प्रा. संत, अित्यादि अुत्साही व वजनदार सदस्य या समितींत असल्यामुळे व डॉ. साठे, श्री. द. ल. मांजरेकर व द. के. बर्वे अित्यादि कार्यकर्त्यांचा पाठिंबा असल्यामुळे भरपूर सदस्यसंख्या मिळून येथे लौकरच म. सा. परिषदेची शाखासभा स्थापन होअील अशी आशा आहे.

बेळगांव येथील वाङ्मय चर्चा मंडळाच्या विद्यमानें महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'प्राज्ञ' व 'विशारद' या परीक्षांचे वर्ग सुरू करण्यांत येणार आहेत.

अनुक्रमणिका



## संलग्नसंस्थावृत्त

### वाङ्मयोपासक मंडळ, नगर

अहमदनगर वाङ्मयोपासक मंडळाचा पंधरावा वार्षिक दिन समारंभ शनिवार दिनांक २२-१-४४ रोजीं नगर शहर पालिकेच्या दिवाणखान्यांत श्री. ज. स. करंदीकर, बी.अे., अेल्‌अेल्.बी., संपादक 'केसरी', ह्यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला.

१९४३ चा अहवाल व हिशेब मंजूर झाल्यानंतर १९४४ सालाकरता पुढीलप्रमाणे कार्यकारी मंडळाची निवड झाली.

अध्यक्ष—रा. ब. न. बा. देशमुख; अुपाध्यक्ष—(१) श्री. दादासाहेब धनेश्वर, (२) ले. कर्नल प. कृ. चितळे; कार्याध्यक्ष—श्री. गो. रा. गायकैवारी; चिटणीस—(१) श्री. प. प. पटवर्धन, (२) श्री. द. बा. डावरे; हिशेबतपासणीस— श्री. बा. ना. दातार; कार्यकारी मंडळ—(१) श्री. रा. ब. हिवरगांवकर, (२) सौ. वेणूताअी मोडक, (३) श्री. ग. कृ. फाटक, (४) श्री. द. वि. आपटे, (५) श्री. शं. बा. आंबेकर, (६) श्री. गो. वि. पंडित, (७) श्री. ना. वा. पंडित, (८) श्री. गो. वि. राजगुरु.

ह्या निवडणुकीनंतर समारंभाध्यक्ष श्री. ज. स. करंदीकर ह्यांचे "विक्रमादित्य हा राजा होअून गेला व त्यानेच विक्रम संवत् सुरू केला" या विषयावर शास्त्रशुद्ध रीतीने व माहितीपूर्ण व्याख्यान झालें व आभारप्रदर्शन होअून समारंभाचें काम संपलें.

— नगर वाङ्मयोपासक मंडळातर्फें नाशिकचे श्री. बा. मो. कानिटकर यांचे अध्यक्षतेखालीं नाट्यशताब्दिमहोत्सव साजरा झाला.

— पुण्याचे श्री. गं. मा. निरंतर, अेम्.अे., बी. टी., यांचे अध्यक्षतेखालीं गडकरी स्मृतिदिन पाळण्यांत आला.

— महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या प्रथमा व विशारद या परीक्षा यंदा प्रथमच नगरास झाल्या. मंडळाच्या खटपटीने नगर केंद्रास मान्यता मिळाली.

— महाराष्ट्राचे मान्यवर साहित्यिक श्री. न. चिं. केळकर ह्यांनी दिनांक १६-४-४४ दिवशीं मंडळास भेट दिली. नेवासें येथील श्रीज्ञानदेवाच्या मंदिराबद्दल व मंडळाच्या नवीन प्रकाशनाबद्दल प्रामुख्याने मंडळाच्या कार्यकारी मंडळाच्या सदस्यांची चर्चा झाली.

— मंडळाने प्रकाशित केलेल्या श्रीज्ञानेश्वरदर्शनाप्रमाणेच श्रीअेकनाथदर्शनाच्या प्रकाशनाचें कार्य या वर्षी मंडळ हातीं घेणार आहे.

— माध्यमिक शाळांतील वरच्या अियत्तेतील विद्यार्थ्यांकरता आंतर्शालेय वक्तृत्वाच्या चढाओढी येत्या जूनमध्ये होणार आहेत.

— महाराष्ट्र साहित्य परिषदेचे चिटणीस श्री. के. नारायण काळे ह्यांचा दिनांक ३०।४।४४ रोजीं मंडळाच्या कार्यकारी मंडळाच्या वतीने सत्कार करण्यांत आला. या प्रसंगीं श्री. काळे ह्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेची नगरास अेक शाखा सभा स्थापन करावी अशी कळकळीची सूचना केली व त्याप्रमाणे शाखासभा स्थापन करावी असा ठराव मंजूर करण्यांत आला व श्री. दादासाहेब धनेश्वर, श्री. रा. ब. हिवरगांवकर, श्री. शं. बा. आंबेकर, श्री. द. बा. डावरे व श्री. प. प. पटवर्धन ह्यांनी सभासद नोंदविण्याचें कार्य हातीं घ्यावें असें ठरलें.

द. बा. डावरे

# नवीन सभासद

## साहाय्यक (हितचिंतकांतून)

श्री. गणेश सदाशिव मराठे, पुणें ४

## तहहयात

श्री. जनार्दन गणपतराव बोधे, मुंबआी

## तहहयात (साधारणांतून)

श्री. रामचंद्र विष्णु जोशी, पुणें
प्रा. वामन पांडुरंग खानोलकर, बेळगांव

## साधारण

श्री. गोविंद बाळकृष्ण जोगळेकर
,, विश्वनाथ अनंत पटवर्धन
,, धोंडो पद्माकर मालसे, भोर (जिल्हा पुणें)
सौ. लीला ढवळे
श्री. गणेश वासुदेव तगारे
,, गो. गं. जोगळेकर, भोर (जि. पुणें)

## सातारा

श्री. रा. ग. कुंभोजकर
,, वा. ह. क्षीरसागर
,, मो. रा. वाळिंबे
,, ज. ग. कुलकर्णी
,, ज. के. रानडे
,, शि. गं. देवरे
,, क. स. आपटीकर
,, दि. म. कुलकर्णी
,, ल. गो. मेहेंदळे
,, म. गो. गोडबोले
,, श्री. रा. आचार्य
,, मा. वा. क्षीरसागर
,, शे. ल. कालगांवकर
,, द. रा. परांजपे
,, बा. चिं. जोगळेकर
,, काशी पेण्ढरकर
,, वा. के. कोल्हटकर

श्री. य. रा. फडके
सौ. निर्मला मराठे
श्री. गोपाळ रा. वर्तक
,, गोविंद रा. वर्तक
,, दा. ज. पेंडसे
,, शं. रं. शेंडे
,, गो. त्र्यं. गुजर
,, बा. वि. भिडे
,, अ. ल. मेहेंदळे
,, वि. ल. भागाशे
,, द. कृ. तबीब
,, त्र्यं. रा. अभंग
,, ग. रा. कुलकर्णी
,, वि. अ. कुलकर्णी
,, श्री. रा. घाटगे
,, वि. स. वखले
,, रा. ग. सोमण
,, शं. रा. सोमण
,, अिंदुमती परांजपे




## धुळें

श्री. ग. य. धारप
,, श्री. मा. मट
,, मा. ग. रेगे

## सोलापूर

कु. सुमतीबाअी शहा
श्री. वि. गो. काकडे
,, श्री. ग. भेगटे

## कराची

श्री. शं. गो. वाळिंबे

## राजकोट

श्री. स्वामी दिगंबरजी बक्षी

## मुंबअी

श्री. गो. गुं. गोखले
,, मुनि केवलविजय, कालंदरी

# सांगली-संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तान्त

**ठराव २** —(महाराष्ट्र विद्यापीठ समितीच्या वृत्तांतावरील संमेलनाच्या शिफारशी. [१] विद्यापीठांतील अध्ययन व अध्यापन मुख्यतः मराठीच्या द्वारें व्हावें, [२] नांव 'महाराष्ट्र विद्यापीठ' असें असावें, [३] मराठी मातृभाषा असणाऱ्या कोणत्याहि व कोठल्याहि गटास विद्यापीठाचा फायदा घेतां यावा.)

वरील ठरावाची नकल सेक्रेटरी, गव्हर्मेंट ऑफ बॉम्बे, यांजकडे पाठविण्यांत आली असून हें पत्र मिळाल्याबद्दलची पोंच त्यांजकडून आलेली आहे.

**ठराव ३** —( करवीर सरकारच्या वरिष्ठ न्यायखात्याचें काम पूर्वापार मराठींत चालू ठेवण्याबद्दल. )

वरील ठरावाची नकल ना. पंतप्रधान व ना. न्यायमंत्री, इलाखा करवीर, यांजकडे पाठविण्यांत आली.

**ठराव ४** —( भंडारा बैतुल जिल्ह्यांतील बंद केलेल्या मराठी प्राथमिक शाळा पूर्वापार चालू ठेवण्याबद्दल. )

वरील ठराव सेक्रेटरी, गव्हर्मेंट ऑफ सी. पी. ॲन्ड बेरार, व अध्यक्ष, जिल्हा कौन्सिल, भंडारा व बैतुल, यांजकडे रवाना करण्यांत आला.

**ठराव ५**— ( कागदावरील नियंत्रणाचें सरकारी धोरण बदलण्याबद्दल ) हिंदुस्थान सरकारच्या सिव्हिल सप्लाईज खात्याचा अधिकाऱ्याकडे हा ठराव पाठविण्यांत आला.

**ठराव ६**—( श्री. शि. ल. करंदीकरकृत 'सावरकर चरित्रा'वरील जप्ती उठविल्याबद्दल व हें पुस्तक लोकसंग्रह छापखान्यांत छापलें गेल्यानें या संग्रहालयाकडून जामीन घेतल्यानें मुद्रण स्वातंत्र्याच्या गळचेपीबद्दल सरकारचा निषेध. )

हा ठराव सेक्रेटरी, गव्हर्मेंट ऑफ बॉम्बे, यांजकडे पाठविला त्याचें खालीलप्रमाणें उत्तर आलें. "As the matter referred to in the resolution is under adjudication by the High Court, Government does not propose to take any further action."

**ठराव ९**—( निजाम प्रांतांतील मराठीच्या गळचेपीबद्दल ) हा ठराव निजाम सरकारचे पंतप्रधान व शिक्षणमंत्री यांजकडे पाठविला.

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.

## साभार स्वीकार



### के. भि. ढवळे यांचीं प्रकाशनें

**बालवीर**— ले० प्रा. के. गो. पंडित, मूल्य चार आणे.
**चित्रा व चारु**— ले० साने गुरुजी, मूल्य दहा आणे.
**नथू नाथ**— ले० मा. श्री. परांजपे, मूल्य दहा आणे.
**श्रीरामरक्षा**— ले० वि. वि. परांजपे, मूल्य दोन आणे.
**किलबिल**— ले० वा. गो. मायदेव, मूल्य सहा आणे.
**मराठी रियासत**— पेशवा बाळाजी विश्वनाथ ले० गो. स. सरदेसाओ, मूल्य रु. १
„ „ „ बाजीराव „ „ „ रु. २॥
„ „ „ बाळाजी बाजीराव „ „ „ रु. २.
**हरवलेल तिकीट**— ले० द. वि. गुप्ते, मूल्य दीड रुपाया.



**अिस्लामपर नवो प्रकाशन**— (गुजराती) ले० व प्रका० महादेवशास्त्री दिवेकर, मिरज; मूल्य तीन रुपये.

**जन्माचे सोबती**— ले० व्यंकटेश वकील; प्रका० वा. वि. भट, भीमरावचाडी, मुंबअी नं. २; मूल्य दीड रुपाया.

**अभंगवाणी**— ले० व प्रका० त्र्यं. रा. अभंग, मत्रानी पेठ, सातारा; मूल्य अेक रुपाया.

**वारा फोफावला**— ले० बाबुराव गोखले; प्रका० म. द. लोखंडे; चिरंजीव प्रकाशन, ३८ डे. जिमखाना, पुणें ४; मूल्य सवा रुपया.

**शिकार**— ले० आनंदीबाओ जेधवंत, दिलखुश बंगला, शिवाजी रोड, बडोदें; मूल्य बारा आणे.

**वीरबाला झोया**— अनुवा० शं. वा. देशपांडे; प्रका० लोकप्रकाशनगृह, राजभवन सँढर्स्ट रोड, मुंबअी ४; मूल्य ८ आणे.

**स्तालिन**— अनुवा० स. ह. मोडक; प्रका० लोकप्रकाशनगृह, मुंबअी ४; मूल्य २॥ आणे.

**मधली भिंत**— ले० ज. ग. शिर्के; प्रका० गोमन्त प्रकाशन; मूल्य १॥ रु.

**डॉ. बाळकृष्ण**— ले० मो. रा. वाळंबे; प्रका० आर्य बुकडेपो, लक्ष्मीपुरी, कोल्हापूर; मूल्य ८ आणे.

**कालगती**— ले० अकिंचन; प्रका० प्र. श्री. गोरे, मानव्यप्रकाशन, ७८२ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. १॥.

**प्रतिपदा**— ले० गो. म. वाटवे; प्रका० बलवंत प्रकाशन, १७२४ रामदेव रस्ता, बेळगांव; मूल्य रु. १।

**सिंगापुरांतून**— ले० मा. वि. वरेरकर; प्रका० भारतीय लोकनाट्य संस्था, १९० ब खेतवाडी, मुंबअी ४; मूल्य १ रु.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास

(म. सा. परिषदेचें ग्रंथप्रकाशन)

वरील ग्रंथ प्रा. **दत्तो वामन पोतदार** यांजकडून मुद्दाम लिहवून घेतला आहे. या ग्रंथांत **म. सा. परिषदेची** इ. स. १९०६ ते १९४२ अखेरची व **म. सा. संमेलनांची** इ. स. १८७८ ते १९४२ अखेरची संपूर्ण व साधार माहिती आली आहे. मराठी भाषेच्या उन्नतिप्रीत्यर्थ स्थापन झालेल्या या आद्य व प्रातिनिधिक संस्थांची अद्यावत् माहिती या ग्रंथांत मोठ्या परिश्रमाने संकलित करण्यांत आली असून वृत्तविभागांतील प्रकरणांतून या सर्व माहितीच्या आधारें प्रा. पोतदार यांच्या मार्मिक विहंगमावलोकनाचा लाभहि वाचकांस होणार आहे. संमेलन-परिषद् या संस्थांच्या हितचिंतकांस व इतर अभ्यासकांसहि हा ग्रंथ संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी पडेल अशा तऱ्हेने या ग्रंथाची मांडणी झालेली आहे. **आकार** रॉयल अष्टपत्री. **पृष्ठें** १७५. **मूल्य** रु. ३. **सभासदांस** रु. १॥. ट. ख. नि.—

**चिटणीस**
म. सा. परिषद्, पुणें २